


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

विश्वविद्यालय अनुदान आयोगाच्या घोषित यादीतील
विद्वत्-प्रमाणित त्रैमासिक

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन



मराठी
ಕನ್ನಡ गारो खासी
ગુજરાતી ਗੁਰਮੁਖੀ
മലയാളലിപി మరాఠీ
असमिया മറാഠി डोगरी
हिंदी বাংলা తెలుగు મરાઠી
ਗੁਰਮੁਖੀ মরাঠী बोडो
ਗੁਰਮੁਖੀ गारो हिंदी मैतेयी
మరాఠీ खासी
नेपाळी മറാഠി తెలుగు মরাঠী
తెలుగు বাংলা असमिया
ગુજરાતી ਗੁਰਮੁਖੀ മറാഠി
मराठी മലയാളലിപി

अनुक्रमणिका








**मराठी अभ्यास परिषद पत्रिका - भाषा आणि जीवन**

**त्रैमासिक :** हिवाळा (जानेवारी), उन्हाळा (एप्रिल), पावसाळा (जुलै), दिवाळी (ऑक्टोबर)

**विश्वविद्यालय अनुदान आयोगाच्या घोषित यादीतील विद्वत्-प्रमाणित त्रैमासिक**

**RNI 40048 ISSN : 2231-4059**

**वर्ष ३८, अंक २-३, उन्हाळा-पावसाळा २०२०, एप्रिल-जून, जुलै-सप्टेंबर २०२०**

**भाषा आणि जीवन**

**संपादक :** आनन्द काटीकर

**कार्यकारी संपादक :** विजय पाध्ये,

**संपादन समिती :** सलील वाघ, वैशाली कार्लेकर, कलिका मेहता

**प्रकाशक, मुद्रक, संपादकीय व व्यवस्थापकीय पत्रव्यवहार आणि वर्गणी पाठवण्यासाठी पत्ता -**
आनन्द काटीकर, 'पसायदान' बंगला क्र. ७, फर्ग्युसन महाविद्यालय आवार, गोखले मार्ग, डेक्कन जिमखाना, पुणे-४११ ००४

**संपर्क :** ९४२१६ १०७०४

**ई-पत्ता :** marathi.abhyas.parishad@gmail.com

**मुद्रणस्थळ :** विनायक एन्टरप्रायझेस, ५१७ कसबा पेठ, पुणे ४११ ०११

**वर्गणीचे दर**

| | व्यक्ती | संस्था |
|---|---|---|
| वार्षिक | १५०/- | २००/- |
| त्रैवार्षिक | ४००/- | ५५०/- |
| पंचवार्षिक | ७००/- | ९००/- |
| आजीव | ५,०००/- | संस्थांसाठी नाही |

**सुट्या अंकाची किंमत - रु. ४०/-**



**- थेट बँकेत वर्गणी भरण्याची सूचना -**

खातेधारक नाव : मराठी अभ्यास परिषद

खाते क्रमांक : २००५ ७१६ ४२६०

बँकेचे नाव : बँक ऑफ महाराष्ट्र

शाखा : टिळक रस्ता, पुणे

IFSC : MAHB 00 000 41

वर्गणी भरल्यावर कृपया ९४२०३ २२९८२ किंवा ९४२१६ १०७०४ या क्रमांकावर संपूर्ण नाव सविस्तर पत्त्यासह कळवावे.

**सूचना :** १) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या कोणत्याही लेखाशी, लेखकाच्या मतांशी संपादक किंवा मराठी अभ्यास परिषद सहमत असेलच, असे नाही.

२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे. तथापि या अंकात प्रसिद्ध झालेल्या कोणत्याही लेखाशी, लेखकाच्या मतांशी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ आणि महाराष्ट्र शासन सहमत असेलच, असे नाही.

३) मराठी अभ्यास परिषद पत्रिका भाषा आणि जीवन हे विद्वत्-प्रमाणित त्रैमासिक आहे. येथे प्रसिद्ध होणारा कोणताही लेख त्या विषयातील तज्ज्ञांच्या अभिप्रायानंतरच प्रकाशित केला जातो. त्यामुळे लेखकांनी लेख पाठवताना प्रकाशनासाठी लागणारा काळ लक्षात घ्यावा, ही विनंती.

**मुखपृष्ठ रचना :** आनंद लडकत (प्रकाशचित्रांसाठी सौजन्य-आंतरजाल) ... घमारे




**मराठी अभ्यास परिषद पत्रिका - भाषा आणि जीवन**

विश्वविद्यालय अनुदान आयोगाच्या घोषित यादीतील विद्वत्-प्रमाणित त्रैमासिक

**RNI 40048** **ISSN : 2231-4059**

वर्ष ३८, अंक २-३, उन्हाळा-पावसाळा २०२०, एप्रिल-जुलै २०२०

---

**अनुक्रमणिका**

संपादकीय

## मातृभाषा – मायबोली

आनन्द काटीकर

मूल आईच्या पोटात असताना जी भाषा ऐकत ऐकत जन्म घेते, ती त्या मुलांची मातृभाषा-मायबोली असते, असे मानले जाते. आपल्या प्राचीन समाजरचनेतही आईचे महत्त्व होतेच. मुलाला घडवण्याची सगळी जबाबदारी प्रामुख्याने आईकडेच होती. घर हे स्त्रीचे कार्यक्षेत्र असल्याने तिच्याच हाती पाळण्याची दोरी होती आणि बाळाचा उद्धार तीच करू शकत होती. त्यामुळे मुलांवर संस्कार करणे, त्यांचे योगक्षेम वाहणे ही आईचीच जबाबदारी होती. त्यासाठी ती जी भाषा बोलत होती, त्याच भाषेची आणि मुलाची गट्टी जमायची आणि ते मूल जे काही ज्ञान ग्रहण करायचे, ते प्रामुख्याने मातृमुखातूनच. (येथे मातृ म्हणजे केवळ आई अपेक्षित नाही तर आजी, आत्या, मावशी, काकू, मामी, ताई इत्यादी स्त्रियांही अभिप्रेत आहेत.) या अनौपचारिक शिक्षणाची धुराही आईच वाहत होती/आहे. स्वाभाविकच मातृभाषेला म्हणजेच मायबोलीला मुलांच्या बाल-भावविश्वात महत्त्वाचे स्थान होतेही आणि असतेही.

मात्र परिस्थिती बदलली. स्त्री घराबाहेर पडू लागली आणि घराबाहेर पडत नसली तरी केवळ अनौपचारिक शिक्षणाच्या मर्यादा जाणवल्यामुळे, औपचारिक शिक्षण ही नवीन व्यवस्था निर्माण झाली. या औपचारिक व्यवस्थेत शिक्षणाचा एक ज्ञानशाखा म्हणून विचार केला गेला. मुलांच्या मेंदूचा विकास, त्याचे भावविश्व, भाषेचे स्थान इत्यादींचा विचार करून त्या व्यवस्थेचे भाग (पूर्व-प्राथमिक, प्राथमिक, माध्यमिक इत्यादी) ठरवण्यात आले आणि शिक्षण देण्यासाठी भाषा हे महत्त्वाचे माध्यम असते, हे लक्षात घेऊन मातृभाषा अशी संकल्पनाही शिक्षणशास्त्रात रुजली.

दरम्यान आणखी परिस्थिती बदलली. लोक एका प्रादेशिक विभागातून दुसऱ्या विभागात सहजपणे स्थलांतर करू लागले. परिणामी आईची (वडील आणि अन्य जवळचे नातलगही यात गृहीत आहेत.) भाषा आणि आजूबाजूच्या परिसराची भाषा यांत फरक पडायला लागला. मग परिसरभाषा अशी आणखी एक नवीन संकल्पना शिक्षणशास्त्राने स्वीकारली. त्यातून मातृभाषेपेक्षा ज्ञानग्रहणासाठी परिसरभाषा, जास्त उपयुक्त असते, हेदेखील लक्षात आले. सामान्यत: ८०% समाजाची मातृभाषा आणि परिसरभाषा एकच असते. त्यामुळे ज्ञानाचे संक्रमण होणे सुलभ असते. अनौपचारिक, औपचारिक आणि सहज अशा शिक्षणाच्या तीनही

प्रकारांतून ज्ञान, माहिती विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचते आणि त्यांचा बौद्धिक, भावनिक विकास सहजपणे साध्य होतो. म्हणजेच व्यक्तीच्या विकासाची दिशा योग्य राहते.

ज्ञानक्षेत्रात मातृभाषेला महत्त्वाचे स्थान आहे. शिक्षणाचे माध्यम मातृभाषा असेल तर विद्यार्थ्याला ज्ञानग्रहणात अडथळे कमी येतात, हे सार्वत्रिक सत्य सर्वच शिक्षणतज्ज्ञांनी स्वीकारलेले आहे. मानवी जीवनात मातृभाषेचे स्थान मूलभूत आहे, हे सर्वांना मान्यच आहे. यासंदर्भात पेशवेदरबारातील एक कथा सांगितली जाते. एका विद्वानाने येऊन माझी मातृभाषा कोणती आहे, ते ओळखून दाखवा; असा पेच पेशव्यांपुढे टाकला. त्याच्याशी चर्चा करताना सर्वच भाषेतले विद्वान अचंबित झाले आणि त्याची मातृभाषा नेमकी कोणती असेल, हे ते ओळखू शकले नाहीत. तो विद्वान रात्री गाढ झोपलेला असताना, नाना फडणवीसाने त्याच्या अंगावर पाणी ओतले आणि मग तो ज्या भाषेत ओरडला, ती त्याची मातृभाषा-मायबोली आहे, हे सिद्ध केले. या गोष्टीतूनही मातृभाषेचे पायाभूत स्थान स्पष्ट होते. आपला मेंदू आपल्याही नकळत आपल्या मायबोलीतच विचार करत असतो. म्हणजेच माणसाच्या भावनिक, आत्मिक, मानसिक, सामाजिक, सांस्कृतिक विकासात त्याची मायबोली त्याला मदतरूप ठरत असते.

जगाच्या इतिहासातही मायबोलीचे महत्त्व ठसवणाऱ्या काही महत्त्वाच्या घटना घडलेल्या आहेत. त्यांपैकी एक महत्त्वाची घटना म्हणजे २१ फेब्रुवारी हा 'आंतरराष्ट्रीय मातृभाषा दिन' म्हणून साजरा होणे. धार्मिक आधारावर भारताची फाळणी होऊन भारत आणि पाकिस्तान ही दोन राष्ट्रे अस्तित्वात आली. पूर्व पाकिस्तान (म्हणजे आजचा बांगला देश) आणि पश्चिम पाकिस्तान (आजचा पाकिस्तान) अशा दोन भागांत पाकिस्तान विभागलेला होता. धार्मिक आधारावर स्वतंत्र होताच पाकिस्तानने लादलेल्या उर्दू भाषेविरुद्ध पूर्व पाकिस्तानात असंतोष भडकला. धीरेन्द्रनाथ दत्त यांनी सर्वप्रथम २३ फेब्रुवारी, १९४८ रोजी, जाहीरपणे पाकिस्तानच्या संसदेत या असंतोषाला वाट करून दिली आणि बांगला भाषेच्या गळचेपीविरुद्ध लोकशाही लढ्याची सुरुवात झाली. सलग ४-५ वर्षे चाललेल्या या लढ्यात दि. २१ फेब्रुवारी, १९५२ रोजी सैन्याने केलेल्या गोळीबारात पाच जण ठार झाले आणि शेकडो लोक जखमी झाले. परिणामी मातृभाषेच्या ओढीतून स्वतंत्र बांगला(देशी) नागरिकत्वाची ओळख निर्माण होऊ लागली. पुढे १९५६ मध्ये, बांगला भाषेला पाकिस्तानने अधिकृत राजभाषा म्हणून मान्यता दिली असली तरी अंतर्गत राजकारणात बांगला-भाषकांचे ठरवून खच्चीकरण करण्याचे प्रयत्न तत्कालीन





अनुक्रमणिका

पाकिस्तानी राज्यकर्त्यांनी केले. अखेर १९७१ मध्ये गृहयुद्ध होऊन स्वतंत्र बांगलादेश अस्तित्वात आला. बांगलादेशात आजही २१ फेब्रुवारीला मातृभाषा दिन आणि शहीद दिन अशा नात्याने ओळखले जाते. ही मातृभाषेविषयीची जाज्वल्य प्रेमभावना लक्षात घेऊन युनेस्कोने १९९९ मध्ये दि. २१ फेब्रुवारी हा 'जागतिक मातृभाषा दिन' म्हणून साजरा करण्याचे घोषित केले आणि २००० सालापासून आंतरराष्ट्रीय पातळीवर मातृभाषा दिन साजरा होऊ लागला. मानवाच्या आयुष्यात मातृभाषेला धर्मापेक्षा अधिक महत्त्व असते, हेच या उदाहरणातून लक्षात येते.

भाषेच्या महत्त्वाचे दुसरे उदाहरण आहे, ते इस्राईलमधील हिब्रू भाषेचे. जगभरातील ज्यू समाज १९४८मध्ये इस्राईलच्या रूपाने सुमारे २००० वर्षांनंतर परत एकत्र आला. २००० वर्षे वेगवेगळ्या देशांत राहिल्यामुळे झालेले सांस्कृतिक, सामाजिक, भाषिक बदल स्वीकारून सर्वजण धर्माच्या धाग्याने एकत्र आले खरे! पण त्यांना पुढे एकत्र ठेवायचे असेल तर देश आणि धर्माच्या नाजूक धाग्याला भाषेच्या घट्ट दोरखंडाची सोबत हवी, हे लक्षात घेऊन त्यांच्या नेत्यांनी केवळ धर्मग्रंथांत बंदिस्त झालेल्या हिब्रू भाषेला एका जिवंत भाषेचे रूप आणण्यासाठी आकाशपाताळ एक केले, लोकांच्या मनातील खुळ्या समजुती मोडून काढल्या, धर्मभाषा आपण कशी बोलायची म्हणून विरोध करणाऱ्या व्यक्तींच्या मनातील काल्पनिक भय दूर केले आणि आज हिब्रू भाषेत बालवाडी ते संशोधन अशा सर्व पातळ्यांवरील ज्ञान दिले-घेतले जाऊ शकते, इतकी तिची भरभराट झाली आहे. यासंदर्भात 'याचसाठी केला होता अट्टाहास' ही संस्कृतमधून मराठीत अनुवादित झालेली कादंबरी वाचनीय आहे.

आपली मातृभाषा टिकवण्यासाठी केवळ भावनिक एकात्मता असून भागत नाही तर ती सर्व क्षेत्रांत वापरली जाण्यासाठी कष्ट घ्यावे लागतात. विविध साधने तयार करावी लागतात. लोकांना ती वापरण्यासाठी उद्युक्त करावे लागते. त्यानंतरच आपली भाषा व्यवहारभाषा होते, ज्ञानभाषा होते, तिचे क्षेत्र विस्तारते. केवळ प्रतिशब्द निर्माण करून भागत नाही तर ते शब्द ज्ञानाचे वाहक व्हावे लागतात. आपल्या भाषेत लोकांना ते समजावून सांगता यावे लागते. तर आणि तरच आपली भाषा आपले पोटही भरू शकते आणि मनही!

बांगला आणि हिब्रू भाषकांनी आपल्या मातृभाषेचे महत्त्व जाणले आणि त्यासाठी लढा देऊन किंमतही मोजली. आपणही आपली भाषा टिकवण्यासाठी, विकसित करण्यासाठी असेच सजग राहू या, हीच शुभेच्छा!

# मातृभाषा

**श्रुती पानसे**

भाषा, ही म्हटलं तर त्या व्यक्तीपुरती असते. आपण कोणत्या भाषेत बोलायचं, शिकायचं, व्यक्त व्हायचं हे ती व्यक्ती ठरवते. पण दुसरीकडे; समाज, संस्कृती, ज्ञान आणि एकूण परंपरा यांच्याशीही भाषा जोडलेली असते. अशी आपल्या घरापासून आंतरराष्ट्रीय स्तरापर्यंत भाषा जात असल्याने ती अत्यंत महत्त्वाची आहे.

मातृभाषेचं अनौपचारिक आणि सहज शिक्षण बाळाच्या जन्माच्या आधीपासून सुरू होतं. लहानपणापासून किंवा अगदी जन्मापासून, घरोघरी बाळांच्या कानावर विविध भाषा पडत असतात. पण तरीही बाळ आईच्या पोटात असतं तेव्हापासून आई जी भाषा बोलते, ती ते ऐकत असतं. आईचा आवाज बाळाला अगदी स्पष्ट ऐकू येत असतो. इतरांचे आवाज जरा लांबून किंवा अस्पष्ट ऐकू येत असतात. त्यामुळे आईची जी भाषा असेल किंवा आई ज्या अनेक भाषा बोलत असेल, ते बाळ ऐकत असतं. मातृभाषेची सुरुवात होते ती अशी, जन्माच्या आधीपासूनच! बाळ जन्माला आल्यावर त्याला इतरांचे आवाजही स्पष्टपणे ऐकू येतात. घरात बोलली जाणारी भाषा ते बाळ अगदी सहजपणे शिकतं. जी मुलं सामान्य असतात, मेंदूत कोणतीही गुंतागुंतीची समस्या नसते, ती मुलं जन्मल्यापासून ते पहिल्या दोन वर्षांत घरात बोलली जाणारी किमान एक भाषा पूर्णपणे बोलायला शिकतात. त्यातलं व्याकरण, विशिष्ट उच्चार, उच्चारांची लकब आणि आवाजात चढ-उतार, ही प्रत्येक भाषेची खासियत असते. त्यांसह मूल स्वत:ची मातृभाषा आत्मसात करतं. ह्यासाठी मेंदूची यंत्रणा व्यवस्थित काम करते. भाषाग्रहणाच्या या प्रक्रियेला काही अवयव कारणीभूत असतात.

- **पहिली पायरी:** कान हे आपलं महत्त्वाचं ज्ञानेंद्रिय. कानांवाटे मेंदूत पोहोचलेल्या ध्वनिलहरी आणि ऑडिटरी कॉर्टेक्सचा यात महत्त्वाचा सहभाग असतो.
- **दुसरी पायरी:** भाषा शिकण्यासाठी मेंदूतले ब्रोका आणि वर्निक ही दोन क्षेत्रं महत्त्वाची आहेत. मूल जन्माला येतं तेव्हापासून मेंदूतलं वर्निक हे क्षेत्र काम करत असतं. वर्निक हे भाषा आकलनाचं क्षेत्र आहे. ब्रोका हे भाषानिर्मितीचं क्षेत्र आहे. आसपासची माणसं ज्या भाषेत बोलतात, त्यातले शब्द वर्निक या क्षेत्रात साठवले जातात. वयाच्या साधारणत: वर्ष-दीड वर्षापर्यंत ब्रोका हे क्षेत्र

विकसित होतं.

- **तिसरी पायरी:** जेव्हा ब्रोका विकसित होतं, तेव्हापासून मुलं बोलायला लागतात. जी भाषा, जे शब्द आतापर्यंत वर्निकमध्ये साठवले गेले आहेत, तेच शब्द आणि तीच भाषा मूल बोलतं. ऐकलेल्या भाषेशिवाय दुसरं काहीही मूल बोलत नाही. प्रत्येक मुलाचा ब्रोका विकसित होण्याचा काळ वेगवेगळा असतो. मुलांच्या आसपास जे काही बोललं जाईल त्यामुळे मुलांची भाषा पहिल्या दोन-अडीच वर्षांत चांगली विकसित होते. याउलट ज्या मुलांच्या कानावर भाषा फारशी पडत नाही त्यांचा भाषेचा विकास सीमित होतो.

वयाची पहिली दोन वर्षं भाषाशिक्षणासाठी चांगली असतात. मूल अगदी सहजपणे भाषा शिकतं. त्यासाठी चुका आणि शिका या पद्धतीने नवीन शब्द, नवीन शब्दांचा वापर, उच्चार या सगळ्या गोष्टी मूल आपलं आपलं शिकतं. या काळात आसपासचे सर्व आवाज मुलांचे कान टिपत असतात. घरच्या, शेजारच्या माणसांकडून, नातेवाईकांकडून ज्या भाषा सहजरित्या मुलांच्या कानावर पडतात , त्या त्यांना बोलता येऊ शकतात. जन्मापासून जी मुलं एकापेक्षा जास्त भाषांच्या / भाषकांच्या संगतीत असतात, त्यांना कमी-अधिक प्रमाणात त्या सर्व भाषा समजतात. मुलांना या भाषांमध्ये व्यक्त होण्याच्या संधी मिळाल्या तर मुलं या भाषा बोलूही शकतात. कारण ही नैसर्गिक यंत्रणा आहे.

या संपूर्ण काळात मुलं स्वत:हून भाषा आत्मसात करत असतात; कृत्रिमरित्या शिकत नसतात. त्यामुळे मुद्दाम शिकवायला जाऊ नये. त्यात सक्ती आणि जबरदस्ती आली तर मूल सहजपणे भाषा आत्मसात करू शकणार नाही. मेंदूची ही क्षमता लक्षात घ्यावी आणि सहज – पूरक वातावरण तयार करता आलं तर करावं. मुद्दाम शिकवायला जाऊ नये. हे पालकांनी विशेषत्वाने लक्षात घ्यावे.

आपल्याकडे प्रामुख्याने इंग्रजी माध्यमातून शिक्षण घ्यायची मुलांवर सक्ती केली जाते. एवढंच नाही तर मुलं शिकताना चुकली किंवा इंग्रजीखेरीज मातृभाषेत बोलली तर शिक्षा देखील केली जाते. यामुळे मुलांच्या केवळ भाषेवरच नव्हे तर विचारप्रक्रियेवर आणि एकूणच शिक्षणप्रक्रियेवर दूरगामी विपरीत परिणाम होतो, हे त्यावेळी या शाळांच्या आणि पालकांच्या लक्षातच येत नाही. यासाठी मातृभाषेतून शिक्षण ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे.

ज्ञानरचनावादाचा सिद्धांत हेच सांगतो, की पूर्वज्ञानावर आधारित नव्या माहितीची रचना आपला मेंदू करत असतो. याच पद्धतीने आपण कोणतीही गोष्ट,

कोणतीही कला शिकत असतो. प्रत्येक गोष्टीबद्दल प्रत्येकाला सहजपणे काही माहिती मिळालेली असते. मुलं लहानपणापासून विविध माहिती कळत-नकळत जमवत असतात. हे असतं आपलं पूर्वज्ञान.

प्राथमिक शिक्षणात बहुतेक मूलभूत संबोध मुलांना शिकायचे असतात- आत्मसात करायचे असतात. या संबोधांवर पुढच्या शिक्षणाची दिशा ठरणार असते. गणितातले बेरीज-वजाबाकी-गुणाकार-भागाकार, भाषांचे वाचन आणि लेखन, विज्ञानातल्या संकल्पना शिकायच्या असतात.

या पूर्वज्ञानाच्या आधारावर नवे अनुभव रचून, त्यासाठी नवे कष्ट घेऊन पुढचं शिक्षण घडणार असतं. इथे त्यांचं पूर्वज्ञान म्हणजे त्यांची मातृभाषा आहे. हे सर्व शिकणं सोपं व्हावं, यासाठी मातृभाषेतून शिक्षण असायला हवं. सर्व प्रगत देशांमध्ये मातृभाषेतून शिक्षण दिलं जातं. यामुळे मुलं सहजपणे ज्ञान आत्मसात करतात. अनेक शिक्षणतज्ज्ञांनी मातृभाषेतून शिक्षण असावं, हे नमूद केलं आहे. यासाठी विज्ञानाधारित संशोधनं केली आहेत. मेंदूसाठी हे सोपं आणि सहज आहे. आपल्याकडे - पूर्ण भारतातच मुलांना स्वत:ची मातृभाषा बाजूला ठेवून इंग्रजीत शिकणं क्रमप्राप्त ठरत आहे. इतर भाषा शिकणं आणि इतर भाषांतून संकल्पना स्पष्ट होणं, ही वाट अवघड आहे, हे लक्षात घ्यायला पाहिजे.

नव्या शैक्षणिक धोरणामध्ये, मातृभाषेतून शिक्षण द्यावे, यावर भर दिलेला आहे. ही फार ठळक गोष्ट आहे. यामुळे आदिवासी बोलींसुद्धा या परिघात येऊ शकतात. पण त्याचबरोबर, 'जिथे शक्य आहे तिथे मातृभाषेत शिक्षण द्यावे', अशा विधानामुळे लोक पळवाटा शोधतील, त्यामुळे या धोरणाची अंमलबजावणी करताना ही बाब विशेषत्वाने लक्षात घ्यावी लागेल.

**(पृष्ठ १४ वरून)** **मावळत्या सूर्याची साथ**

असे असले तरी त्यातील प्रत्येकाला जंगलात कधी जातो आणि आपल्या माणसांत आपल्या माणसांसारखा कधी राहतो, याची ओढ लागलेली असते. माणसांचं हे 'आपलेपण' भाषेशिवाय कधी पूर्ण होतं का? त्या भाषेचा भावबंध डॉ. अब्बी आज जपत आहेत. उगवत्या सूर्यासमोर सारेच नमतात, मावळत्याचे सोबती फार थोडे. मावळत्या भाषासूर्याची साथ करणाऱ्या डॉ. अब्बी त्यांपैकीच एक. **(साभार - 'साप्ताहिक लोकप्रभा' दि. ५ ऑक्टोबर, २०१२)**

# करपणारी भाकरी आणि लोपणारे ज्ञान!

देविदास देशपांडे

सुमारे तीन वर्षांपूर्वी आलेल्या आणि आबालवृद्धांच्या पसंतीस उतरलेल्या 'बाहुबली' चित्रपटात अनेक आकर्षक गोष्टी होत्या. त्यासोबतच एक विचित्र गोष्टही होती. ती होती किलीकिली भाषा! होय, तीच ती कालकेय या खलनायकाच्या टोळीच्या तोंडी असलेली भाषा. एखाद्या भारतीय चित्रपटासाठी एखादी नवी भाषा तयार करण्याची ही पहिलीच वेळ होती. या भाषेत ७५० शब्द आणि व्याकरणाचे ४० नियम असल्याचे सांगण्यात आले होते. जेम्स कॅमेरॉनच्या 'अवतार' आणि 'दी लॉर्ड ऑफ दी रिंग्ज' या हॉलिवूडच्या चित्रपटांसाठीही अशा भाषा रचल्या होत्या.

या चित्रपटांचा समान धागा म्हणजे त्यातील युद्ध आणि संघर्ष! जेथे संघर्ष आहे आणि लाभ-हानीची शक्यता असते, तेथे संपर्कव्यवस्था अत्यंत कार्यक्षम असणे ही प्राथमिक गरज असते. त्यासाठी, प्रतिपक्षाच्या हाती आपली रहस्ये पडू नयेत , यासाठी गुप्त संदेश हा महत्त्वाचा भाग असतो आणि हा संदेश गुप्तच राहावा, यासाठी भाषेला गुप्ततेची डूब देणे ही निकडीची गोष्ट ठरते. अफझलखान येत असल्याची वार्ता समर्थ रामदास स्वामी यांनी छत्रपती शिवाजी महाराजांना कवितेतून पोहोचविल्याची गोष्ट किमान मराठी माणसांना तरी सांगायला नको. आपल्याकडे सर्रास वापरली जाणारी 'च' किंवा 'क'ची भाषा हीही अशीच!

राजकारण आणि लष्करी लढायांमध्ये तर अशा रोचक गोष्टींचा खजानाच असतो. 'युद्धस्य कथा रम्या' म्हणतात ते काही उगीच नाही. रणांगणावरील प्रत्यक्ष लढाईशिवायही युद्धात इतक्या काही गोष्टी असतात आणि आपल्यासारख्या सामान्यांना त्या इतक्या अचंबित करतात, की सांगता सोय नाही.

आता हेच पाहा ना. दुसऱ्या महायुद्धात दोस्तराष्ट्रांसाठी लढणाऱ्या सैनिकांनी आपल्या-आपल्यात संवाद साधण्यासाठी आणि माहितीची देवाणघेवाण करण्यासाठी एका भाषेची निर्मिती केली. या भाषेचा उलगडा करण्यासाठी जपानी सैन्याने (अक्षरशः!) जंग जंग पछाडले; मात्र तिचा संपूर्ण छडा त्यांना कधीही लागला नाही. दुर्दैवाने या भाषेची माहिती त्या अमेरिकी सैनिकांनंतर इतरांपर्यंत फारशी पोहोचलीच नाही. पिकले पान गळावे तसे ही भाषा बोलणारा एक-एक ज्येष्ठ सैनिक काळाच्या पटावरून अंतर्धान पावत गेला. अन् जगातील झपाट्याने अस्तंगत होणाऱ्या भाषांमध्ये या गुप्त भाषेचाही क्रमांक लागला.

नवाहो या नावाने ही कूटभाषा ओळखली जात होती. मूळ अमेरिकी आदिवासींच्या भाषेत काही भर घालून ही भाषा तयार करण्यात आली होती. ही कूटभाषा बोलू शकणाऱ्या शेवटच्या शिलेदारांपैकी एकाचे निधन गेल्या आठवड्यात झाले. त्यामुळे 'नवाहो कोड'ची चर्चा पुन्हा सुरू झाली.

अल्फ्रेड के. न्यूमॅन असे या सैनिकाचे नाव होते. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात अमेरिकेची फर्स्ट बटालियन, ट्वेंटी- फर्स्ट मरीन रेजिमेंट, थर्ड मरीन डिव्हिजन यांत त्यांनी सेवा बजावली. त्यांनी न्यू मेक्सिकोत वयाच्या ९३व्या वर्षी शेवटचा श्वास घेतला. ही भाषा बोलणाऱ्यांना कोड टॉकर या नावाने ओळखले जाते. न्यूमॅन हे याच गटाचा भाग होते. आजही असे सुमारे एक डझन लोक जिवंत आहेत, असा या तुकडीतील सैनिकांना विश्वास आहे; मात्र महायुद्धानंतर दीर्घकाळ हा कार्यक्रम गोपनीय ठेवण्यात आल्यामुळे त्यांची निश्चित संख्या माहीत नाही. नवाहो हे अमेरिकेच्या वायव्येकडील भागांमध्ये राहणाऱ्या मूळ अमेरिकी जमातीच्या लोकांचे नाव, तसेच त्यांच्या भाषेचेही नाव. अमेरिकी सैन्यातील एका गटालाही याच नावाने ओळखले जात होते. कारण या गटाने नवाहोवर काही शब्दांचे कलम करून स्वतःपुरती एक गुप्त आणि अभेद्य भाषा तयार केली होती. आपल्या चाली, तुकड्यांच्या हालचाली आणि आदेश देण्यासाठी ही भाषा वापरण्यात येत असे.

या लोकांनी विकसित केलेली सांकेतिक भाषा जपानी लोकांसाठी मोठी डोकेदुखी ठरली होती. इवो जिमा, सायपान आणि पॅसिफिक महासागरातील अन्य क्षेत्रांत अमेरिकी सैन्याने मिळवलेल्या अनेक विजयांमध्ये या भाषेचे योगदान असल्याचे मानले जाते. उदाहरणार्थ, इवो जिमा येथे या कोड टॉकर्सनी ४८ तासांच्या अवधीत ८०० अचूक संदेश पाठवले होते.

सध्या अगदी हाताच्या बोटांवर मोजता येण्याजोगे कोड टॉकर जिवंत उरले आहेत. त्यातील तीन हयात कोड टॉकरना नोव्हेंबर २०१७मध्ये व्हाइट हाउसमध्ये सन्मानित करण्यात आले होते. त्यावेळी अध्यक्ष ट्रम्प यांनीही या विषयाची आपल्याला पूर्वी माहिती नव्हती, हे कबूल केले होते. तसेच त्यांनी जनरल जॉन केली यांनी सांगितलेले एक वाक्यही सांगितले होते.–'सर, ते किती महान होते, त्यांनी या देशासाठी काय केले याची तुम्हाला काहीच कल्पना नाही. या देशासाठी असलेल्या त्यांच्या शक्ती, बहादुरी आणि प्रेमाची आपल्याला कल्पना नाही.'

या मूळ अमेरिकी नवाहोंची भाषा अमेरिकी सैन्यात कशी आली, याचीही सुरस कथा आहे. 'सीआयए'च्या म्हणण्यानुसार, नवाहो भाषेचा गुप्त कोड म्हणून

वापर करण्याची योजना ही फिलिप जॉन्स्टन या सेनाधिकाऱ्याची. त्याचे आई-वडील मिशनरी होते. त्याचे बालपण नॅव्हाजोंच्या राखीव वस्त्यांमध्ये गेले होते.

अमेरिकी आदिवासींची भाषा संकेतभाषा म्हणून वापरण्याची कल्पना ही तशीही नवीन नव्हती. अमेरिकेच्या सैन्याने पहिल्या महायुद्धाच्या वेळी 'चोक्टॉ' या भाषेचा उपयोग केला होता; जर्मनी आणि जपानने दोन महायुद्धांच्या दरम्यानच्या काळात चोक्टॉ व अन्य आदिवासी भाषांचा अभ्यास केला होता. नवाहो भाषेची वाक्यरचना आणि व्याकरण मात्र गैर-नवाहोंसाठी त्रासदायक आहे. सर्वांत महत्त्वाचे म्हणजे ती लिखित नाही, केवळ तोंडी आहे. अमेरिकी सैन्याने सॅन दिएगोजवळील कॅम्प इलियटमध्ये १९४२पासून २९ नॅव्हाजोंना भरती केले होते. त्यांनी २००पेक्षा जास्त नवीन नवाहो शब्दांची निर्मिती केली. हे शब्द सैन्याच्या विविध गोष्टींसाठी तयार करण्यात आले होते. सैनिकांना ते शब्द लक्षात ठेवावे लागत. हे शब्द शिकलेल्या १५ कोड टॉकरना ऑगस्ट १९४२मध्ये प्रत्यक्ष लढाईत सहभागी करून घेण्यात आले. ग्वाडालकॅनल येथे पहिली लढाई झाली. त्यानंतर फर्स्ट मरीन डिव्हिजनचे कमांडर मेजर जनरल अलेक्झांडर व्हँडेग्रिफ्ट यांनी आपल्या वरिष्ठांना आणखी नवाहोंना पाठविण्याची विनंती केली.

'नवाहो कोड अद्भुत आहे. शत्रूला तो कधीच समजू शकला नाही. आम्हालाही तो समजला नाही. परंतु तो चोख काम करतो. आम्हाला आणखी काही नवाहो पाठवा,' असे व्हँडेग्रिफ्ट यांनी म्हटले होते. महायुद्ध संपेपर्यंत ३५०हून अधिक जणांनी ही सांकेतिक भाषा शिकली होती. ही भाषा घडविणाऱ्या २९ मूळ नवाहो कोड टॉकरना अमेरिकेचे तत्कालीन अध्यक्ष जॉर्ज डब्ल्यू. बुश यांनी २००१मध्ये काँग्रेशनल गोल्ड मेडल बहाल केले होते. त्या सैनिकांपैकी आज कोणीही जिवंत नाही. त्यांच्यापैकी शेवटचे सदस्य चेस्टर नेझ २०१४मध्ये मरण पावले.

अमेरिकी सैन्याने या योजनेवरील गोपनीयतेचे आवरण अनेक वर्षे काढले नव्हते. ते १९६८मध्ये हटविण्यात आले आणि त्यानंतर ही गोष्ट जनतेपर्यंत पोहोचली. न्यूमॅन यांच्यामुळे त्या सर्व घटनेला पुन्हा उजाळा मिळाला. ज्या आदिवासींना मारून युरोपीय सत्तांनी अमेरिका खंड हस्तगत केला, त्यांच्याच भाषेने त्यांना तारले हेही या निमित्ताने पुढे आले. ज्ञान इतरांना वाटले की वाढते, असे म्हणतात. नवाहो काय किंवा आपल्या 'च' किंवा 'क'च्या भाषेचे काय, त्या जर इतरांपर्यंत पोहोचल्या नाहीत, तर त्याही इतिहासात अशाच लुप्त होतील..... न फिरविल्यामुळे करपणाऱ्या भाकरीसारख्या! न्यूमॅन यांच्या निमित्ताने हेच सत्य अधोरेखित झाले!

दखलयोग्य

## मावळत्या सूर्याची साथ!

उमेश करंदीकर

माणसानं जेव्हा भाषेचा शोध लावला नव्हता तेव्हा तो कसा जगत असेल? भावभावना, विचार, कल्पना यांच्या अभिव्यक्तीअभावी त्याचं जगणं अपूर्णच नसेल? माणसानं ज्यावेळी भाषा निर्माण केली त्यावेळी तो खऱ्या अर्थानं पूर्ण झाला असला पाहिजे. भाषेमुळे तो खऱ्या अर्थानं व्यक्त होऊ शकला आणि म्हणूनच खऱ्या अर्थानं 'व्यक्ती'ही झाला. भाषेवर माणूस जगतो आणि भाषाही माणसाच्या आधारावर जगत असते. माणसागणिक भाषेचा पाया पक्का होत असतो आणि एखादी भाषा बोलणाऱ्या माणसांची संख्या जसजशी घटत जाते तसतसे त्या भाषेच्या अस्तित्वालाच हादरे बसू लागतात. अंदमान आणि निकोबार बेटातल्या मुख्यत: जारवा आदिवासींची भाषा अशीच शेवटच्या घटका मोजत आहे आणि तिला वाचवण्यासाठी तगमगीनं धडपडत आहेत, प्रा. अन्विता अब्बी.

जवाहरलाल नेहरू विद्यापीठात भाषा, साहित्य आणि संस्कृती अध्ययन केंद्रातील भाषा विभागाच्या धुरीण असलेल्या प्रा. अब्बी यांनी गेली तीन दशके भाषासेवा चालवली आहे. देशातील आदिवासींच्या अस्तंगत होत चाललेल्या बोलीभाषा तसेच अखेरच्या घटका मोजत असलेल्या अन्य भाषा, हा त्यांच्या संशोधनाचा विषय आहे. देशातील प्रत्येक भाषेचा उगम ज्या भाषक कुटुंबात वा गटात आहे, त्याचाही त्यांनी तपशिलात जाऊन अभ्यास केला आहे. अंदमानात सध्या विरत चाललेल्या भाषांसाठी नेहरू विद्यापीठातच त्यांनी 'व्हॅनिशिंग व्हॉयसेस ऑफ द ग्रेट अंदमानीज' हा खास अभ्यासविभाग सुरू केला आहे. ब्रिटिशांनी जेव्हा अंदमान आणि निकोबारवर कब्जा केला तेव्हा या बेटांवर दहा प्रमुख आदिवासी जमाती होत्या आणि त्यांची लोकसंख्या पाच हजार होती. आज या प्रमुख जमातींतील आदिवासींची लोकसंख्या केवळ ५० आहे. बो, खोरा, सारे आणि जेरू या त्यांच्या चार भाषा आहेत आणि आता जसजशी ही लोकसंख्या घटत आहे तसतशा या भाषाही अस्तंगत होत आहेत. २००४ साली या बेटांना त्सुनामीने तडाखा दिला, तेव्हा ८० वर्षांची बोआ ही वृद्धा इतकी तंदुरुस्त होती, की कोणत्याही झाडावर ती सहज चढत असे. पण तिची मैत्रीण बोरो निवर्तली तेव्हा बोआ पुरती खचली. कारण तिची मातृभाषा (बो) जाणणारी एकमेव व्यक्तीच तिने कायमची गमावली होती. आता त्या बेटावरच्या कुणालाही 'बो' भाषेतली गाणी समजत





अनुक्रमणिका

नाहीत. बोरोंच्या साथीने ती गाणी गाण्यात जो आनंद होता, तो बोआने गमावला आहे. जिथे आपली भाषा कुणाला येत नाही अशा प्रांतात 'आपुल्या मायबोलीचे भेटो मज कोणी' अशी माणसाला किती आस असते. परक्या देशात आपली भाषा बोलणारा कुणी अचानक गवसला तर माणसाला किती आनंद होतो! प्रत्यक्षात ती भाषा बोलणारी लक्षावधी माणसं पृथ्वीच्या पाठीवर नांदत असताना आणि ती भाषा धोक्यात नसतानाही तिचे अल्पसे दुरावणे माणसाला किती अस्वस्थ करते. मग आता आपली भाषा बोलणारा, समजणारा या जगात एकही माणूस नाही, ही जाणीव किती खोलवर जखम करणारी असेल! बोरो गेल्यापासून मला एकटं वाटत आहे, असं बोआने डॉ. अब्बी यांना सांगितले. या अनुभवाने हळव्या झालेल्या डॉ. अब्बी यांनी मग एक मोठेच काम हाती घेतले. त्यांनी; बो, खोरा, सारे आणि जेरू या चारही अंदमानी लोकभाषांच्या जतनासाठी एक शब्दकोश तयार केला. हे काम अशा एका वाक्यात सांगून झाले तरी ते सोपे नव्हते. त्यासाठी ती भाषा जाणणाऱ्यांच्या हृदयापर्यंत पोहोचावे लागले, त्यांचा विश्वास संपादन करावा लागला, ती भाषा जाणून घ्यावी लागली आणि लिखित ग्रंथाद्वारे ती कायमस्वरूपी जतन होणार असल्याने तिच्या अचूकपणासाठी तपस्याही करावी लागली. बो आणि खोरा या भाषा बोलणारी केवळ एक एक व्यक्ती हयात होती. त्यामुळे हे काम अधिकच वेगाने केले गेले. त्यातून चारही भाषांतील अडीच हजार शब्दांचा कोश तयार झाला.

डॉ. अब्बी यांचे कार्य यापुढेही विस्तारत जाणार, याचा सुखद प्रत्यय आला तो; नेहरू विद्यापीठातील प्रमोदकुमार या विद्यार्थ्याने डॉ. अब्बी यांच्या मार्गदर्शनात अनंत अडचणींवर मात करून, जारवा आदिवासींवर पीएच.डी. संपादित केली, तेव्हा! जारवा आदिवासींची संस्कृती आणि त्यांची भाषा यांचा समग्र दस्तऐवज त्याने आपल्या प्रबंधाद्वारे मांडला आहे. जारवा भाषेचे व्याकरण या प्रबंधाद्वारे प्रथमच शब्दबद्ध झाले आहे. या संशोधनाने या कार्याला वेग आला असला तरी हे कार्य तितकेच गुंतागुंतीचे आणि किचकटही आहे. आज या आदिवासींशी डॉ. अब्बी यांचे भावबंध जुळले आहेत आणि ते आदिवासीही त्यांना आपल्या सुहृद मानत आहेत. आदिवासींची पुढची पिढी आज पोर्ट ब्लेअरला रोजगारासाठी येते, तेव्हा त्यांचा पेहराव शहरी माणसांसारखाच होऊन जातो.

अंदमानी हिंदी प्रत्येकाला येते आणि आज तेही शहरी संस्कार आत्मसात करीत आहेत.

(पृष्ठ ९ पाहा)

## असं समजा की!

मूळ हिंदी कथा – **नेहा सिंह**; मराठी भाषांतर – **पृथ्वीराज तौर**

'असं समजा की!' हे आईचे आवडते शब्द आहेत.

"असं समजा की! ही एक अंधारी गुहा आहे!" आई म्हणायची

आणि आमची खोली अचानक गुहेत बदलून जायची. भिंती दगडांमध्ये परावर्तित होत, अंथरूण जंगली प्राण्यांत बदलत असे आणि दूरवर खळखळ वाहणारा एक झरा दिसू लागे.

"असं समजा की! हे हॉस्पिटल आहे आणि तू डॉक्टर! आम्ही सगळे तुझे पेशंट!", आई म्हणत असे. नंतर तासभर डॉक्टर-पेशंट खेळ चालत राही. नुसती धमाल होई.

"असं समजा की! हा दरबार आहे. तू अकबर, हा बिरबल आणि आम्ही तुमचे मंत्री!" एखाद्या दिवशी आई म्हणायची. मग घराची होई फत्तेपूर सिक्री! 'दिवान-ए-आम'मध्ये झडत सगळ्या चर्चा, होत वाद-विवाद!

एके दिवशी घराची वीज गुल झाली. मे महिना होता. आम्ही सगळे उकाड्यानं हैराण झालो. चिपचिपणाऱ्या घामानं त्रस्त झालो. आई म्हणाली, "असं समजा की! आपण काश्मीरमध्ये हिमालयाच्या बर्फाच्छादित पर्वतावर आहोत." आमच्या डोळ्यांपुढे काश्मीरचे सुंदर खोरे दिसू लागले. आम्ही एकमेकांवर बर्फाचे गोळे फेकले, शालिमार उद्यानाची सफर केली. दल सरोवरात नौकाविहार केला. सगळा उकाडा दूर पळून गेला. दिवसभर वीज आली नाही आणि आम्ही दिवसभर काश्मीरमध्ये भटकत राहिलो. रेवाताई म्हणाली, "आई, माझं स्वेटर कुठं आहे? बघ मला थंडी वाजतेय."

त्यादिवशी आम्हाला कळून चुकलं, 'असं समजा की!' हे शब्द केवळ गमतीचा खेळ नाहीयेत, तर जादू आहेत. अनोखी!









अनुक्रमणिका

# कविता आणि बोली

इंद्रजित भालेराव

मित्रांनो, बोली हा विषय जरा वेगळा आहे. बऱ्याचदा आपणाला असं वाटतं, की खेड्यांत माणसं जी बोलतात ती बोली आणि शहरांत माणसं जी बोलतात ती प्रमाणभाषा! पण असं नाहीये, शहरांतली आणि खेड्यांतलीही माणसं बोलीच बोलत असतात. फक्त पुस्तकातील छापील भाषा ही प्रमाणभाषा असते. शहरांतली माणसं, स्वयंपाक करणाऱ्या बायका घरात जी भाषा बोलतात, ती बोलीभाषाच असते. शुद्ध प्रमाणभाषेमध्ये पुस्तकी भाषेमध्ये शहरांतलीही माणसं बोलत नसतात आणि तसं ती बोलू लागली तर ते चांगलं वाटत नाही. त्यामुळे बोली म्हणजे जी बोलली जाते. शहरांत असो की खेड्यांत, ती बोली. त्या बोलीचा आणि कवीचा जो काही संबंध आहे, त्याविषयी आपण बोलणार आहोत.

साहित्यामध्ये बोली यायला पाहिजे, असा आग्रह गेल्या शंभरएक वर्षांमध्ये धरला गेला. त्याआधी प्रमाणभाषेमध्येच लोक लिहीत होते. मग हळूहळू बोलीचा आग्रह व्हायला लागला. का व्हायला लागला बोलीचा आग्रह? कशासाठी कवितेमध्ये बोली आली पाहिजे? याची काही कारणं आहेत. एक म्हणजे अनुभवाची अपरिहार्यता म्हणून बोली आली पाहिजे. फॅशन म्हणून बोली वापरण्याची गरज नाही. तुम्ही जो अनुभव व्यक्त करताय तो प्रमाणभाषेत व्यक्तच करता येत नाही, फक्त तो बोलीतच व्यक्त होऊ शकतो असं जर असेल, तर बोली वापरावी.

अनुभव नेमकेपणानं व्यक्त करण्यासाठी साहित्यात बोली येत असते. जनसामान्यांच्या जवळ जाण्यासाठी आपणाला बोलीचा वापर करायचा असतो. नाहीतर सामान्य माणसं साहित्यापासून दूर राहतात. त्यांना वाटतं की, 'बाबा आपण बोलतो ती ही भाषा नाहीये, ह्या लोकांचं हे कायतरी वेगळं चालू आहे.' लोकांच्या भाषेत जर आपण बोलू लागलो, त्यांच्या भाषेत जर आपण कविता लिहू लागलो. तर लोकांना वाटतं, 'हे आपलं आहे.' लोकांच्या जवळ जाण्यासाठी सुद्धा आपण बोलीचा उपयोग करायचा असतो. खरंतर प्रत्येक कवीला कविता बोलीतच सुचत असते, असं मला वाटतं. कोणाही कवीला प्रमाणभाषेत कविता सुचत नाही, मग प्रमाणभाषेत कवी कविता का लिहितात? तर त्याची दोन कारणं आहेत. काही कवी बोलीभाषेला न्यूनगंडानं कमी लेखतात आणि म्हणून ते त्या बोलीत कविता लिहीत नाहीत. ते प्रमाणभाषेमध्ये रूपांतरित करून कविता लिहितात आणि काही कवींना असं वाटतं की कविता बोलीत लिहिली तर ती सगळ्या मराठी भाषकांना समजणार

नाही. म्हणून वाचकांची सोय म्हणूनं काही कवी प्रमाणभाषेमध्ये कविता लिहितात.

सगळं लोकसाहित्य हे बोलीतच होतं, ते कधीच प्रमाणभाषेमध्ये लिहिलं गेलं नाही. साहित्याला, भाषेला, संगीताला, चित्रपटाला मरगळ आली की, सगळे जण लोकव्यवहाराकडे, बोलीकडे, लोकसंगीताकडे जातात आणि आपल्यामध्ये प्राण फुंकून घेतात. जेव्हा मराठी कवितेला मरगळ आली, तेव्हा लोक लोककवितेकडे गेले. तिथून नवीन आकृतिबंध, नवीन लयी, नवीन शब्द घेऊन पुन्हा त्यांनी मराठी कविता समृद्ध केली. जेव्हा चित्रपटसृष्टीला तीच तीच प्रमाणभाषा वापरून कंटाळा आला, मग चित्रपटसृष्टी मराठी असो की हिंदी. त्यांनी बोली वापरायला सुरुवात केली. मराठीमध्ये जेंव्हा सामान्य माणसापर्यंत, खेड्यापाड्यांपर्यंत सिनेमाच्या टाक्या (टॉकिजे) निघाल्या आणि लोक पाहायला लागले, तेव्हा कोल्हापुरी भाषेतले सिनेमे येऊ लागले. पात्रं कोल्हापुरी भाषेत बोलू लागली. हिंदीमध्ये सुद्धा स्वातंत्र्यानंतर सामान्य माणसांपर्यंत चित्रपट गेले. खेड्यापाड्यापर्यंत टुरिंग टाक्या गेल्या तेव्हा 'गंगा जमना'सारख्या चित्रपटासाठी (१९६१) भोजपुरी बोली पहिल्यांदा वापरण्यात आली आणि लोकांना ती प्रचंड आवडली आणि तिथून पुढं लोकांनी बोली वापरायला सुरुवात केली. कारण बोली वापरली की जास्तीतजास्त लोकांपर्यंत तुम्हाला पोहोचता येतं. जेव्हा जेव्हा प्रमाणभाषा मृत व्हायला लागते तेव्हा तिला जिवंत होण्यासाठी बोलीकडं जावं लागतं.

ज्ञानेश्वर असो, नामदेव असो, एकनाथ असो, तुकाराम असो या सगळ्या संतांनी आपलं साहित्य बोलीत लिहिलं होतं. कारण तेव्हा मराठी ही बोली होती, प्रमाणभाषा, ग्रंथभाषा नव्हती. म्हणून या लोकांनी जेव्हा पहिल्यांदा लिहिलं तेव्हा या लोकांना चिडवलं गेलं. तेव्हा अभिमानानं ज्ञानेश्वरांनी सांगितलं, "माझा मराठाची बोलू कवतिके। परि अमृतातेही पैंजा जिंके। ऐसी अक्षरे रसिके। मेळविन।।" हे सगळ्यांना माहीत आहेच. बोलीभाषेचं समर्थन करून त्यांनी बोलीतच ज्ञानेश्वरी लिहिली. एकनाथ महाराजांनी सगळी भारुडं, गवळणी बोली भाषेत लिहिल्या. त्यांनासुद्धा लोक आडवे आले, तेव्हा एकनाथ महाराजांनी उपरोधिक भाषेत विचारलं, "संस्कृत भाषा देवे निर्मिली आणि मराठी काय चोरे आणिली?" आणि त्यांनी खास आपल्या बोलीत (मराठी भाषेत) लिहायला सुरुवात केली आणि तुकारामांपासून तर खास कुणब्याची भाषा एकदम पूर्ण आत्मविश्वासानं वापरायला सुरुवात झाली आणि हीच भाषा नंतर प्रमाणभाषा झाली. जेव्हा बोलीतलं साहित्य निर्माण व्हायला लागलं आणि पाठीमागं लोक यायला लागले. भाषेमध्ये नेहमी





अनुक्रमणिका

लोकशाही चालते, हुकूमशाही चालत नाही. सगळे लोक जेव्हा संतांच्या पाठीमागे चालले, तसं पंडितांनाही वाटायला लागलं, तेव्हा पंडितही पुन्हा बोलीकडे यायला लागले. इथं पुन्हा त्यांनी व्याकरण सिद्ध केलं. त्या भाषेला प्रमाणभाषेचं रूप देण्याचा प्रयत्न केला. संतांनी बोलीत लिहिलं, शाहिरांनी सुद्धा बोलीत लिहिलं. त्यांना तर सामान्य माणसांच्या समोरच जायचं होतं. 'लटपट लटपट तुझं चालणं मोठ्या नखऱ्याचं' ही लावणी अप्रतिम आहे आणि किती गाजलेली आहे. ज्यातले शब्द घेऊन 'बाजीराव मस्तानी'सारख्या अलीकडच्या हिंदी चित्रपटात तयार केलेलं गाणं लोकांना आवडलं. 'लटपट लटपट' हे जे शब्द आहेत ते बोलीतले आहेत. असे पुष्कळ शब्द शाहिरांनी वापरले आणि ते लोकांच्या जवळ गेले.

बोलीपासून आपलं मराठी साहित्य केव्हा दूर गेलं? संतांनी बोलीत लिहिलं, शाहिरांनी बोलीत लिहिलं, पंडित कवींनी बोलीत लिहिलं नव्हतं. त्यामुळं पंडित कवींना लोकांनी स्वीकारलं नाही, हे आपणाला माहीत आहे. लोकांना त्यांच्या कविता फारशा माहीत नाहीत. मग प्रमाणभाषेचं खूळ मध्येच कुठून आलं? तर इंग्रज आल्यानंतर प्रमाणभाषेला महत्त्व आलं. मग त्या नादाला लोक लागले. पण त्या काळात प्रमाणभाषा वापरणारे कवीसुद्धा बोली वापरायला लागले. बालकवींची 'औदुंबर' नावाची कविता आहे.

'ऐल तटावर, पैल तटावर हिरवाळी घेऊन
निळा सावळा झरा वाहतो बेटाबेटातून
चार घरांचे गाव चिमुकले पैल टेकडीकडे
रानमळ्यांची दाट लागली हिरवी गर्दी पुढे'

या कवितेतील 'चिमुकले', 'ऐलतट पैलतट' हे शब्द बोलीमधले आहेत. किंवा भा.रा.तांबेंच्या कवितेतील 'पिवळे तांबूस ऊन कोवळे पसरे चौफेर' या ओळीतील 'तांबूस' हा शब्द ग्रामीण बोलीतला आहे. असे शब्द वापरून ज्यांनी कविता लिहिल्या, त्यांना लोकांपर्यंत पोहोचता आले. ज्यांना अशा कविता लिहिता आल्या नाहीत त्यांना लोकांपर्यंत पोहोचता आलं नाही. पहिल्यांदा संपूर्ण आत्मविश्वासानं मराठीमध्ये ग्रामीण बोलीतली कविता आली ती बहिणाबाई चौधरींची कविता. त्यांना मराठी भाषेतली प्रमाणभाषा येण्याचा प्रश्नच नव्हता. त्या निरक्षर होत्या आणि त्यामुळं त्यांची कविता आपोआपच पूर्णपणे बोलीतून आली. ती कोण छापणार? असं त्यांच्या लेकाला, सोपानदेव चौधरींना पण वाटलं. पण जेव्हा आचार्य अत्रेंनी सांगितलं की, "अरे हे सोनं आहे सोनं!" आणि मग ते पुस्तक प्रकाशित झालं

आणि त्याला प्रचंड मोठा प्रतिसाद मिळाला. बहिणाबाईंचा जन्म १८८०चा. बहिणाबाईंचं निधन १९५१ साली झालं. त्यांच्या मृत्यूनंतर एक वर्षाने १९५२ साली त्यांचा कवितासंग्रह प्रकाशित झाला, 'गाणी बहिणाईची' (बहिणाईची गाणी) म्हणून. बहिणाबाईंना प्रमाणभाषा येत नव्हती, हे किती चांगलं होतं. बोलीत लिहिणाऱ्या बहिणाबाईंचीच कविता अजूनही टिकून आहे. बहिणाबाई कविता लिहीत होत्या, त्या काळात जे इतर कवी-कवयित्री प्रमाणभाषेत कविता लिहीत होते, ते नामशेष झाले. पण बहिणाबाईंनी बोलीत लिहिलं म्हणून त्या अजून टिकून आहेत. बहिणाबाईंच्या रूपानं ग्रामीण भागातून लिहिणाऱ्या नवीन लेखकांना आत्मविश्वास आला की, 'अरे आपण बोलीमध्ये लिहू शकतो आणि बोलीमध्ये लिहिलं ते चांगल्या प्रकारे प्रसिद्धीस येऊ शकतं.' १९३३ साली 'सुगी' नावाचा एक ग्रामीण कवितासंग्रह प्रकाशित झाला होता. त्यात ग्रामीण जीवनावरच्या कविता होत्या पण त्या बोलीतल्या कविता नव्हत्या आणि ज्या होत्या त्यामध्ये कवींनी आत्मविश्वासानं ती बोली वापरलेली नव्हती. म्हणून बहिणाबाई हा मराठी बोलीतला संपूर्णपणे आणि सुंदर असा पहिला उद्गार होता, असं आपल्याला सांगता येतं. बहिणाबाईंनी त्यांच्या कवितांमध्ये पेरणीपासून ते कापणीपर्यंत शेतकऱ्याचे जीवन चित्रित केलेलं आपणाला पाहायला मिळतं. म्हणून मी माझ्या एका कवितेमध्ये शिकलेल्या कवींना उद्देशून म्हटलेलं आहे -"'शिकलेल्या कवी जरा वाच बहिणाबाईला। बघ लाजावून गेली कशी चिल्हाटी जाईला।।" मला बहिणाबाईंच्या सगळ्याच कविता पाठ आहेत. बहिणाबाईंची जी कविता बोलीच्या सामर्थ्याचं उदाहरण म्हणून सांगता येते ती म्हणजे, 'शेतीची साधनं' नावाची कविता.

'सरत सरत करे पेरत पेरत । मोघडा मोघडा पेरनीचा चवघडा
पांभर पांभर मागे धारय झांबर । कोयप कोयप निंदाईले सोप सोप
आऊत आऊत आला कमाइले ऊत । तीफन तीफन व्हये शेताचं मापन
चाहूर चाहूर आता सरलं काहूर । वखर वखर घाले मायेची पाखर
नागर नागर सर्व्या सुखाचं आगर'

अशी शेतकरी जी शेतीची साधनं वापरतो, त्याचीच बहिणाबाईंनी कविता केली. ही कविता प्रमाणभाषेत लिहिता येईल काय? शक्यच नाही. पेरणीच्या सुरुवातीची ही बहिणाबाईंची कविताही पाहा -

'पेरनी पेरनी आले पावसाचे वारे । बोलला पोपया पेर्ते व्हां रे पेर्ते व्हा रे!
पेरनी पेरनी  आले आभायात ढग । ढगात बाजंदी ईज करे झगमग





अनुक्रमणिका

पेरनी पेरनी आभायात गडगड । बरस बरस माझ्या उरी धडधड
पेरनी पेरनी काढा पांभरी मोघडा । झडीन तो झडो कव्हा बर्साती चौघडा
पेरनी पेरनी आला धरतीचा वास । वाढे पेरनीची शेतकऱ्या, तुझी आस
पेरनी पेरनी आता मिरुग बी सरे । बोलला पोपया पेर्ते व्हारे पेर्ते व्हारे
पेरनी पेरनी भीज भीज धरती माते । बीय बियान्याचे भरुन ठेवले पोते
पेरनी पेरनी अवघ्या जगाच्या कारनी । ढोराची चारनी कोटी पोटाची भरनी
पेरनी पेरनी देवा, तुझी रे करनी । दैवाची हेरनी माझ्या जीवाची झुरनी'

अशी ही बहिणाबाईंची कविता प्रमाणभाषेत लिहिता येणं शक्य आहे काय? ह्या कवितेतले शब्द, बोलीचा गोडवा, तो रुजवा, अनुभव नेमके पकडण्याची शक्ती हे प्रमाणभाषेमध्ये उतरणं शक्य नाही. म्हणून बहिणाबाईंची कविता, सशक्त कविता आहे. बहिणाबाई चौधरींच्यानंतर पुन्हा एकदा १९३५ साली जन्माला आलेले आणि २०१५ साली ज्यांचं निधन झालं ते आनंद यादव यांनीही बोलीमध्ये कविता लिहायला जाणीवपूर्वक सुरुवात केली. बहिणाबाईंना प्रमाणभाषा येतच नव्हती. पण आनंद यादवांना प्रमाणभाषा येत होती. हे शिकलेले होते. तरीही त्यांनी आपल्या कवितेमध्ये जाणीवपूर्वक प्रनाणभाषेऐवजी बोली वापरली. ती वापरण्यामागचं शास्त्र त्यांनी सिद्ध केलं. लोकांना ते मांडून दाखवलं, रचून दाखवलं. बोलीच्या समर्थनाचं साहित्यशास्त्र सिद्ध केलं. १९६० साली, आनंद यादवांचा 'हिरवे जग' हा कवितासंग्रह प्रकाशित झाला. त्यानंतर १९७८ साली 'मळ्यांची माती' आणि १९८९ साली 'मायलेकरं'. 'मायलेकरं' ही संपूर्णपणे बोली भाषेतली दीर्घकविता आहे. त्यांनी गद्यसुद्धा बोलीत लिहिलं. आनंद यादवांनी 'खळाळ' हा कथासंग्रह, 'गोतावळा' ही कादंबरी पूर्णपणे बोलीभाषेत लिहून ते आव्हानही पेलून दाखवलं. त्यांची 'पेरणीच्या दिसात' नावाची एक कविता आहे. पेरणीच्या दिवसांमध्ये काय घडतं ते शेतकऱ्यांच्या बाजूनं नव्हे, मजुरांच्या बाजूनं काय घडतं ते त्यांनी फार छान पद्धतीने सांगितलं आहे. एक बाई उपवास धरते आणि दुसरी म्हणते की दिवसभर कष्ट करावे लागतात, तू उपवास का करतेस? एव्हढ्या कष्टामध्ये उपवास काय करायचाय तुला? तो धरू नकोस तू. तर त्याचं उत्तर ती बाई देते ते मजुराचं दुःख आहे. मजुराच्या अडचणी आहेत आणि ते फार सुंदर पद्धतीने मांडलेलं आहे.

'खरं सांगू का वयनी मला जरा बी आवरत नाय भूक
मग हे वार करण्यात कुठलं आलंय हो सुख
रोजगाराला जायला पाहिजे रोज एकाच्या बांधावर





अनुक्रमणिका

मग असं उपाशी असलं की कोण घेईल कानावर
आता कुठं लागलीया की पेरणी ही आठ पंधरा दिस
म्हणून हे वाराचं सोंग न्हाय तर काय खातीस
कोणतरी सांगतंय टोकनायला भुईमूग तेचा मग भरतोय रोजगार
आणि चूल बंद करून असंल त्यो करतोय वार'
'दिलेलं टोकनायला दानं त्यातलंच खातोय ईळभर
शेतकरी बी देतोय मुभा वार केल्याचं सांगितल्यावर
असंच करतोय मी पेरणीच्या दिसात
भाकरीचा तुकडा नसतोय ईळाच्या पोटी
उरीवतोय सांजच्या पारी बळंनं घरला न्यायला ओटी'

असं हे आनंद यादवांचं हिरवं जग. त्याविषयी फारसं बोलत नाही. ना. धों. महानोर हे त्यानंतरचे महत्त्वाचे कवी. १९६७ साली त्यांचा पहिला कवितासंग्रह प्रकाशित झाला. 'रानातल्या कविता' हा सगळ्यांना माहीत असलेला अतिशय सुंदर कवितासंग्रह आहे. त्यांना अभिजात निसर्गकविता लिहायची होती, त्यामुळं त्यांनी बोलीभाषा वापरली नाही. काहीशी संस्कृतप्रचुर भाषा आणि काही बोलीभाषेतले शब्द घेऊन त्यांनी उत्तम निसर्गकविता लिहिली. बोलीभाषा पूर्ण वापरली नाही पण उत्तम कविता लिहिली त्यांनी. पण बोलीत कविता लिहिणाऱ्यांची खिल्ली उडवणारी एक कविता लिहून स्वत:च्याच कवितेवर डाग निर्माण केला.

त्यानंतर १९९१ साली पुढं आले ते विठ्ठल वाघ, 'काया मातीत मातीत' हा कवितासंग्रह घेऊन. त्यांनी बोली घेऊन मोठ्या सामर्थ्यानं आणि आत्मविश्वासानं व्यासपीठं गाजवली. आम्ही जेव्हा तरुण होतो तेव्हा आमच्या डोळ्यांसमोरचा तो आदर्श होता. बोलीसाठी 'बोली' नावाचं मासिकसुद्धा काही दिवस त्यांनी चालवलं होतं. फार दिवस नाही चालवता आलं त्यांना! पण प्रयत्न करून पाहिला त्यांनी. बोलीसाठी आणि बोलीत लिहिणाऱ्या खेड्यापाड्यांतल्या लेकरांना प्रोत्साहन देण्यासाठी स्वतंत्र मासिक काढून पाहिलं. म्हणून त्यांचे शब्द आले, "कोरडे जे शेत आहे ओलित झाले पाहिजे । मुक्या जीवांचे दुःख बोलीत आले पाहिजे."

'डेबूजी' आणि 'डेबू' अशा दोन कादंबऱ्या विठ्ठल वाघांनी पूर्ण बोलीत लिहिलेल्या आपणाला पाहायला मिळतात. या विठ्ठल वाघांची 'तिफन' नावाची कविता खूप छान आहे. सुरेश वाडकरांनी ती गायलेली आहे. 'काया मातीत माऽतीऽतऽऽ तिफन चालतेऽऽऽ तिफन चालतेऽऽऽ तिफन चालतेऽऽऽ"

विठ्ठल वाघांची एक कविता 'सोयरीक' नावाची त्याकाळात मला पाठ होती, अजून पाठ आहे आणि खूप छान कविता आहे. ती मला आवडते. त्यात व्यक्त केलेला अनुभव प्रमाणभाषेमध्ये मांडणे शक्यच नाही.

'दन दन दन दन दमणी । झन झन जोळी धामणी
झुला परदे आस्मानी । दमणी थांबली अंगणी
येत होत्या बायका । घोयकाच्या घोयका । होत्या शिरावरी । भरल्या घागरी
थांब खिनभरी । सकवार पोरी । मने बुद्धा ऐसा । हली डुले कैसा
घागरीत टाके । सगुणाचा पैसा । आले आले सजने । भले भले पावणे
खिळकीत येणा । पाहूनिया घेणा । कोण हो देखणा । कोण हो देखणा
आल्याळला आजा । पल्याळला राजा । पाहूनिया घेवो । जळो तुझा सेवो
लाजी शरमिचा । बिनकामी आव । सासरी तं मोठी । होशील वं राव
नको येल पाळू । मांग मांग आळू । मनातून हासा । वरतून लळू
वावरात गेली । वावरात गेली । नागरमोथा आणला । कांडला कुंडला
किक्षाचा सुवास । न्हाणीत सांडला । अंगो पांगी दंडला । वासाच्या तेलात
न्हानलं धुतलं । इंद्रावती रूप । उतलं मातलं । येणी कर फणी कर
हातामधी चुळाभर । पाहेत्या डोळाचा । जीव जावो घळीभर । ये रे दे बगळ्या
कमळाच्या पाकळ्या । हिरवा राघू छंदी । आनी लाल मेंदी । होवो नये दिठ
लावा कायी तीट । आज होणारहो । पक्की सोयरीक । दूध उतू जाये
केव्हळा हरिक । जाई आना जुई आना । आना जाई जुई
असा फासू भवऱ्याले । निंघी जाणारच नाही
फासता फासता । फसली तू बह्मणा । उदासलं गाव । उळाल्यानं मैना'

अलीकडच्या काळामध्ये काही कवी पुन्हा नव्यानं छान लिहिताहेत. दलित कवींनी फारशी बोली वापरली नाही. हे एक निरीक्षण मी मुद्दाम सांगतो. ढसाळ त्याला अपवाद आहेत. त्यांनी मुंबय्या बोली वापरली. आदिवासी कवींनी मात्र बोली छानपैकी वापरलेली आहे. वाहरू सोनावणे यांनी भिलोरी बोलीत कविता लिहिल्या आणि भुजंग मेश्राम यांनी तर गोंडी, परधानी, गोरमाटी अशा अनेक बोली वापरल्या. दलित लेखकांमध्ये प्र. ई. सोनकांबळे आणि उत्तम बंडू तुपे ह्या दोन लेखकांनी उत्तम प्रकारचं गद्य बोलीत लिहिलं आहे. शिवाय रा.रं.बोराडे, भास्कर चंदनशिव, बाबाराव मुसळे, गणेश आवटे, पुरुषोत्तम बोरकर आणि यानंतर 'धग'पुरते का होईना उद्धव शेळके, अशोक कोळी या लोकांनी महाराष्ट्रातल्या कानाकोपऱ्यातल्या भाषा वापरल्या




अनुक्रमणिका

आणि मराठी भाषा समृद्ध केली. नामदेव गवळी यांचा 'भातालय' नावाचा कोकणी भाषेतला कवितासंग्रह नुकताच आलेला आहे आणि फेलिक्स डिसुझा यांचा वसईच्या बोलीतला कवितासंग्रह अलीकडच्या काळात आलेला आहे. नव्या दमाची पुष्कळ नावं लिहिता येतील, पण ही दोन नावं मला लगेच आठवली.

'माझ्या कवितेला यावा शेणानातीचा दरवळ

तिने करावी जाताना काट्याकुट्यात हिरवळ' ही माझ्या कवितेची महत्त्वाकांक्षाच होती. 'माझ्या कवितेने बोल काळजातला बोलावा

'उन्हाळ्यात खापराला जसा असतो ओलावा' असा काळजातला बोल म्हणजेच बोलीभाषा असते. एका कवितेमध्ये मी असं म्हटलं होतं की,

'मायीच्या हाताला होती चव । भाषेला भलतीच श्रीमंती
कन्या घुगऱ्या कुटक्यांना । पंचपक्वानाची गती"

आपणाला माहीत आहे की गरीब घरामध्ये हे पदार्थ केले जातात. अजून पुरावेत म्हणून उरलेले कुटके शिजवले जातात. अन्नधान्याशिवाय घुगऱ्या, नुसतेच दाणे शिजवून तसेच खाल्ले जातात. तेल, मीठ, चटणीची सुद्धा गरज नाही आणि कुण्या घरामध्ये थोडं जर अन्नधान्य असेल आणि दोन वेळेस पुरवायचं असेल तर त्या कण्या भरडून शिजवल्या जातात आणि गुळाचं पाणी टाकून किंवा घरात असेल तर दूध टाकून त्या खाल्ल्या जातात. पण आम्ही जर का आमच्या आईला विचारलं की, "आज काय केलंय आई?" तर आई 'कन्या केल्यात' असं म्हणायची नाही. ती म्हणायची "मणिकसौंदर्या केल्यात." 'शिळे कुटके शिजवले.' असं म्हणायची नाही. ती म्हणायची "धामनकोका केलाय." 'घुगऱ्या केल्यात.' असं म्हणायची नाही "झेलपुऱ्या केल्यात." कारण त्या हातात धरून तोंडात झेलून टाकाव्या लागत. अशी ती भाषा होती. गरिबीलाही श्रीमंत करणारी. म्हणून,

'घुगऱ्या व्हायच्या झेलपुऱ्या । कुटके व्हायचे धामनकोका
भरडलेल्या कन्या घ्यायच्या । माणिक सौंदर्याचा ठेका'

आणि आज माझी अशी परिस्थिती आहे की, '

'झेलपुऱ्या खाय त्याची माय कुठं हाय ।
धामनकोका खाय त्याचा मळा कुठं हाय'

माझी एक 'मुलुख माझा मराठवाडा' नावाची दीर्घ कविता आहे. त्या कवितेमध्येसुद्धा मी माझ्या भाषेचं वैशिष्ट्य सांगितलं आहे. ते असं की,

'बोल उमटता फुल शिवीचा लगडून येतो घोस ।





अनुक्रमणिका

आंदी मंदीच्या संग मंग कवा बवाला ठेस
बुटाडानं पाठाडाची चमडी लोळवू लागे ।
मुलूख माझा मराठवाडा आतून नाद निनादे'

आणि बोलीविषयीची आणखी एक छोटीशी कविता होती -

'लेक बसलेली असायची पाय दुमडून मायीसमोर
माय बसलेली असायची चवड्यावर
याच पोसिशनमध्ये व्हायचा दोघींचा संवाद
त्यालाच म्हणायचे मायबोली
ज्या दिवशी शिकलेल्या लेकीनं मायला ठरवलं गावंढळ
मायीची बोलतीच बंद झाली
तिथंच मोडली मायबोलीची वाट
सगळीकडची भाषा सारखीच झाली सपाट'

या माझ्या काही बोलीविषयक कविता होत्या. आता माझ्या काही बोलीतल्या कविता बघा. 'पीकपाणी' या पहिल्या कवितासंग्रहामधली ही कविता -

'आता पेरणी सरली वाफ धावणीला चल । बैलाचं, पिरथमीचं, तिफणीचं मानू मोल
साती आसरांचा ढब उंबर जाळीच्या ढेल्यात । पाचा ढेकळाचा देव चुना लावून रानात
ढेकळाचा रानदेव त्याला सांज्याचा निवद । सांज वाढू दे रानाचं यंदा नको वद वद
रासनकऱ्याला आहेर सुताराला कुडतंटोपी । सवाशीन तिफणीला खणा नारळाची ओटी
पेरलेल्या ढेकळाच्या रानी बसली पंगत । सालो सालची आबादी आले म्हातारे सांगत।
बारा वर्षानं पाहिली यंदा मिरगी पेर झाली । 'साधला तर महापूर नाहीतर कोण वाली
चाड नळ उतरून काव जुवाची उडल । ताशी लागल्या धानात आता कोळप बुडल'

माझ्या 'पीकपाणी'मधल्या तेरा कविता मी संपूर्ण बोलीत लिहिल्या होत्या आणि नंतर ८० पानांची एक दीर्घ कविता 'आम्ही काबाडाचे धनी' खूप लोकांना आवडली. त्याची मराठीमध्ये शेकडो अनुकरणं झाली आणि या कवितासंग्रहाच्या ११ आवृत्त्या झाल्या आहेत. त्या कवितासंग्रहातली ही एक कविता बघा -

माती झाली मऱ्ही माय मीही मातीचाच लेक । मातीतला खेळ आता मनी येतो येक येक
सरावणातली माती माती मुरली पाण्यात । सुदमुद उतरली भुलाबाईच्या गाण्यात
आम्ही पोरायनं घेतली माती आक्कन चिक्कन । तव्हा झाली लहूवाणी घेऊ लागली बाकन
माती वाकवून केले गाय, बईल, वासरू । उभं राहून पहाती येता जाता वाटसरू
माती झाली साजिवंत जणू लागली बोलाया । घडविली हुबेहूब जित्या बईलाची काया




अनुक्रमणिका

मह्या हाताचा बईल असा सजला धजला । भुज देऊन बसला महादेवाच्या भुजला
रस्त्यावर होता तव्हा येता जाता बाजाराचे । घरी आल्यावरती पहाती शेजारचे पाजारचे
किती पहाती पहाती कशा कोणाच्या नजरा । झाला उलून ठिकऱ्या बैल साजरा गोजरा
लय ईखारी असती काही लोकायची नजर । दगडावर पडली त काळा उलतो दगड
माय म्हणती दिष्टावला बैलासंग तुझा हात । नाही केला तुहा पुन्हा तसा बईल जन्मात'

माझी एक 'कुळंबिणीची कहाणी' नावाची दीर्घ कविता आहे. या कवितेमधला एक तुकडा मी तुमच्यासमोर सादर करतो.

'असा वाढतो संसार जग वाढतंच जातं । तरी बाईच्या वाट्याचं दुःख वाढतंच जातं
बाईचा जलम जसा चुकून झालेला । त्याच नेमक्या येळंला देव उठून गेलेला
ब्रम्हदेवानं बी थोडा डोळा कानाचं केलेला । घडवता घडवता देह ल्हानाच केलेला
काही खाचा उंचवटे देले तसेच ठेऊन । एक पिसवी गर्भाची दिली खाचत खऊन
देवा तूही चूक अशी आज आम्हाला भवली । लोकं म्हणतात कशी नार नाजूक ठिवली
तरी सारा भार आम्ही कुशीमंदीच पेलतो । नामानिराळा पुरुष कांदे नाकानं सोलतो
काय म्हणून बाईनं घर दाराला सोडावं । परक्याच्या दारामंदी काय म्हणून पडावं
भाऊ-भाऊ बापाजीच्या शेतावरले मालक । आम्ही लेकी झालो कशा अधांतरीचा
लोलक
लेकीचा जलम जणू फुटणारी लाही । खाणारा म्हणीतो कशी भाजलीचं नाही
लेकीचा जलम लेकीला कळतो । आत आत कसा आतमा जळतो'

मित्रहो असा हा मराठी बोलीचा आणि कवितेचा प्रवास मला तुमच्यासमोर वाटून घेता आला याचा आनंद आहे. समारोपादाखल 'जल्म' ही बोलीभाषेतली कविता - **माझ्या आईनं मला सांगितलेली माझ्या जलमाची कहाणी**

'दो जीवाची माय मही गेली दूरच्या शेताला । पोटापाण्याच्या वढीनं जीव कामात गुंतला
वटी आलेल्या वटीवं धुडक्याची एक वटी । एकीमधी गर्भ तान्हा एक कापसाच्यासाठी
बोंड बोंडं येचतानी झाली दुपार इखाली । माय गेली सावलीला झोपाळल्या तुरीखाली
आसपासच्या रानात नाही माणसाचा थारा । चिडीचिप पाखराची भर उन्हाचा पहारा
घास कुटका खाऊन जरा टेकविली पाठ । आल्या एकाएकी कळा हातपाय झाले ताठ
घामाघूम झाली माय कावरली बावरली । रेटा देऊन हाताला कशी बशी सावरली
सावरता सावरता कळ उठली जोरात । आडरानात हारण थरकापली उरात
पुढी काय झालं त्याचं मायीला नव्हतं भान । जणू पडलं पाखरू बीन वारशी उतानं
आली सुदीवर तव्हा कूस रिकामी झालेली । मातीवर वल्ला गोळा माती तोंडात गेलेली

बाळातीन झाली माय जशी सीता वनवासी । लव अंकुश खेळले जसे झाडाझुडपाशी
खालीवरी धुडक्यात कापसाच्या डालीमधी । मला घालून मायीनं डाल उचलली आधी
नाही अंगामधी बळ तरी माय तरारली । वल्लीकच्ची बाळातीन नदीमधी उतरली
माय झाली वसुदेव सूर्य झाला नागफना । तरी धीराच्या मायीनं नाही वाकू दिला कणा
माय सांगती अशाच कव्हा गोष्टी जुन्यापान्या । तुह्या जल्माच्या येळला बाळा नव्हत्या रे कन्या
कसं फुटावं रे दूध कशी धरावी कंबर । पोट जगवलं तवा कच्चे खाऊन उंबर
घोरपडीच्या मासानं येती भरून कंबर । त्याच्यासाठी बाप तुहा धुंडू लागला डोंगर
असा झाला तुहा जल्म झाली सगळ्याची दैना । काय सांगू येक येक तुह्या जलमाची कह्यना
भर उन्हात जलमलास माती तोंडात घेऊन । वाढलास एव्हढा तू धान मातीचं खाऊन
मातीसाठीचं जगावं मातीसाठीचं मरावं । बाळा माती लई थोर तीला कसं इसरावं'

**(अखिल विदर्भ वऱ्हाडी साहित्य प्रतिष्ठान अमरावती यांच्या फेसबुकवर केलेल्या भाषणाचे संपादित रूप)**



**संगमेश्वरी बाणकोटी बोलीचा नमुना**

मेलगा पावूस काय थांबत नाय. त्याच्या बापसान मारलान वाटतं. झो नदीला हावूर जास्त हाय. नदिच्या उतराना वायच पान्यात उतरलाव तरी इंदिन मासं पकडायची सोय नाय. तुमी झो काम करा ता वरल्या सखाराम तरलान जी मागच्या खेपंला कोंड धरलान होती तितं जावा. तितं चांगल्या किरव्या वरच्या आंगाच्या परयात मिलतील. सोबत हंडा घ्या. पॉक आलेला हांडा. मनजे नदीन व्हावला तरी रडायची सोय नाय. त्यात झो धरलाव किरवी की टाका. धरलाव किरवी की टाका. हंडातनं किरवी पलायची चानस नाय कुटली. पास्टीक का काय पिशव्या घेऊ नका किरव्या डेंग्यानं फाडतात त्या. तशी पन झो मुंबईला त्या पिशव्या बंद हायत.

बाकी झो एक ध्यानात ठेवा. गुरवाची वाट हायती. चार किरव्या जास्त गावल्या तर त्यातल्या नकावड्या गुरवाला द्या. नायतर झो गुरवान अंगारा फुकलान तर पुडच्या टायमाला किरव्या गावायच्या नाहीत. भुत्ताकी उठलं नी झो किरव्या समजून जाडं वयाले धरतीव. अनि झो घाबरुन पान्यातच मुततीव. काय समजलंव.
(किरव्या -खेकडे; वयाले -पाण्यातला साप)

**विजय बेंद्रे यांच्या फेसबुक भिंतीवरून**

# 'तान' आणि 'वान'

सायली सुरेश पिलणकर

कोकण विभागातील रत्नागिरी हा एक प्रमुख जिल्हा आहे. या जिल्ह्याला १६७ किमी लांबीचा समुद्रकिनारा लाभलेला आहे. समुद्रकिनाऱ्याचा उपयोग करून येथील मत्स्यव्यवसाय भरभराटीस आला आहे. किनारपट्टीलगत आणि खाडी किनाऱ्यावरील गावांमधील अनेक कुटुंबे या व्यवसायावर अवलंबून आहेत . त्यामुळेच मत्स्यउत्पादन हा व्यवसाय जिल्ह्याच्या अर्थव्यवस्थेचा एक महत्त्वाचा घटक बनला आहे. या मासेमारीसाठी आधुनिक तंत्रज्ञानासोबतच काही पारंपरिक तंत्रांचा वापरही केला जातो. कोकण किनारपट्टीवर मुस्लीम, दालदी, भंडारी, खारवी आदी समाजाकडून मोठ्या प्रमाणावर मासेमारी केली जाते . या समाजांनी मासेमारीसाठी आपापली स्वतंत्र तंत्रेही विकसित केली आहेत. प्रस्तुत लेखामध्ये मी भंडारी समाजाच्या 'वान' या विशिष्ट मासेमारी तंत्राचा परिचय करून देणार आहे. हे तंत्र रत्नागिरी तालुक्यातील बहुतांश भंडारी समाजात वापरले जाते.

'वान' आणि 'तान' म्हणजे काय, याकडे वळण्याआधी आपण भंडारी समाजाविषयी थोडी माहिती घेऊ. भंडारी ही कोकण किनारपट्टीवरील एक जात आहे. भंडारी हा शब्द संस्कृत मंधारक म्हणजे दारू गाळणारा या शब्दावरून निघाला असल्याचे एक मत आहे. हे लोक स्वतः मात्र हा शब्द भंडार म्हणजे खजिना यावरून निघाल्याचे सांगतात. यांची वस्ती मुंबई शहरात, त्याखालोखाल रत्नागिरी, ठाणे, कुलाबा, कारवार ह्या जिल्ह्यांत आणि गोमंतक प्रांतामध्ये आहे. भगवान शंकराच्या कपाळावरील घर्मबिंदूपासून भावगुण या भंडाऱ्यांच्या मूळ पुरुषाची उत्पत्ती झाल्याची कथा सांगितली जाते. ताडी व माडी काढणे हा यांचा परंपरागत व्यवसाय आहे. याखेरीज ते मासेमारी, शेती, मजुरी अशी कामेही करतात. इ.स. १८७७ मध्ये माडांवरील कर वाढला म्हणून हे लोक शेती, व्यापार, बागायत, मासेमारी यांकडे वळले. मात्र नौकानयनाशी भंडाऱ्यांचे नाव प्राचीन काळापासून निगडित आहे. यांच्यातील मायनाक ही नौकाध्यक्षाची उपाधी बौद्धकालीन महानायक या शब्दाचा अपभ्रंश आहे. कीर, पांजरी, नामनाईक (नौकानायक), सारंग, तांडेल अशी आडनावेही त्यांचा नौकानयनाशी संबंध दर्शवतात.

प्रस्तुत लेखामध्ये आपण रत्नागिरी तालुक्यातील शिरगाव खाडीपट्ट्यातील भंडारी समाजाच्या 'वान' लावणे, या पारंपरिक मासेमारी पद्धतीबाबत जाणून घेणार





अनुक्रमणिका

आहोत. जिल्हाकेंद्रापासून अवघ्या चार किलोमीटरवर शीळ नदीच्या खाडीपात्रा-शेजारी हे गाव वसलेले आहे. या खाडीपट्ट्यात भंडारी समाजासह, दालदी आणि खारवी या मच्छीमार समाजाचीही वस्ती आहे. मात्र 'वान' फक्त भंडारी समाजाकडूनच लावले जाते. अन्य कोणताही मच्छीमार समाज 'वान' लावत नाही. म्हणून हे केवळ भंडाऱ्यांचे समाजविशिष्ट तंत्र आहे असे म्हणावे लागेल.

समुद्रात रोज दोनवेळा भरती आणि दोनवेळा ओहोटी येत असते. त्यानुसार खाडीमध्ये दोनवेळा पाणी भरते आणि दोनवेळा सुकते. चंद्राच्या कलेप्रमाणे या भरती ओहोटीचे प्रमाण कमी-जास्त होत असते. या भरती आणि ओहोटीच्या चक्राला भंडारी सनाजाच्या बोलीत 'तान' असे संबोधले जाते. या तानावरच पारंपरिक 'वान' लावण्याचे वेळापत्रक अवलंबून असते. 'वान' म्हणजे विशिष्ट क्षेत्र निर्धारित करून तेथे विशिष्ट प्रकारे जाळे लावून मासेमारी करणे.

'वान'मध्ये मासेमारी करणाऱ्या मच्छिमारांना 'वानकरी' म्हणतात. 'वान' लावण्याची प्रक्रिया ही चंद्रकलेवर अवलंबून आहे. 'वान' लावण्यासाठी काही पूर्वतयारीही आवश्यक असते. यामध्ये तिथीप्रमाणे 'तान' पाहिले जाते. यामध्ये पौर्णिमेनंतर येणाऱ्या तानाला 'काळोखाचं तान' आणि अमावस्येनंतर येणाऱ्या तानाला 'चांदण्याचं तान' असे म्हणतात. काळोखाच्या तानात सर्वांत मोठी भरती आणि सर्वांत मोठी ओहोटी लागत असते. तर चांदण्याच्या तानात तुलनेने कमी भरती आणि कमी ओहोटी लागते. वानकरी दोन्ही तानात 'वान' लावत असले तरी काळोखाच्या तानात ते सर्वाधिक नफा कमावतात. प्रत्येक पक्षाच्या एकादशीपासून चंद्रकलेचा समुद्रावरील प्रभाव वाढू लागतो. या प्रभावाच्या काळात एकादशी ते चतुर्थीपर्यंत वानकरी 'वान' लावून मासेमारी करतात. त्यासाठी वानकरी खाडीच्या तानावर लक्ष ठेवतात. त्याला 'तान पाहणे' असे म्हणतात. यामध्ये भरतीच्या वेळी खाडीचे पाणी कोणत्या मर्यादेपर्यंत किनाऱ्यावर चढले होते आणि येत्या काळात ते किती चढू शकेल याचा अंदाज घेतला जातो. हा अंदाज घेतल्यानंतर नवमी किंवा दशमीला खाडीत 'वान' रोवले जाते. त्यास 'वान घोरणे' असे म्हटले जाते. एका वानात चार ते पाच वानकरी काम करतात. त्यांच्यावर जबाबदारी दिलेली असते.

१) वानापर्यंत 'गारफेल' वाहून नेणे (गारफेल : जाड नायलॉनपासून बनविण्यात आलेले जाळे) यात १५ वावांची २५ जाळी वापरली जातात. एक 'वाव' म्हणजे खांद्याच्या रेषेत दोन्ही हात पसरून होईल तेवढे माप. या जाळ्याची उंची ६ फूट असते.




अनुक्रमणिका

२) मोक्याच्या भारी वाहून नेणे ('मोका' : कांदळवन अथवा चिपीच्या झाडाचे १० फूट उंच सरळ सोटे) 'वान' सुमारे ८ दिवस खाऱ्या पाण्यात राहणार असल्याने मोके कुजू नयेत म्हणून खारफुटी झाडांचेच मोके वापरले जातात. एका वानात किमान दीडशे मोके वापरले जातात. वानाच्या क्षेत्रानुसार मोक्यांची संख्या वाढू शकते .
३) खाडीतून प्रत्येकी तीन ते साडेतीन किलो वजनाचे ३००-४०० दगड गोळा करणे.
४) 'वान' कोंडात लावायचं की तोकड्या पाण्यात लावायचं तसेच 'वान' किती दिवस लावायचे याचा विचार करून जागेची निश्चिती करणे ('कोंड' : पाण्याच्या सततच्या प्रवाहामुळे पात्रात तयार झालेली खोलगट जागा. अशा ठिकाणी उत्तम मासेमारी होते. मात्र अशा ठिकाणी 'वटाच्या' म्हणजेच ओहोटीच्या वेळा मर्यादित असतात.) अशी कामांची विभागणी केलेली असते. काहीवेळा 'पायरव' लक्षात घेऊन जागा निवडतात. (पायरव : ठरावीक मासे किनाऱ्याजवळ येण्याचा हंगाम) काहीवेळा ऋतुमानानुसार सोयीच्या जागी 'वान' लावले जाते. कारण मोठ्या पावसाच्या दरम्यान 'वान' व्हावण्याचा' ('वान'साठी लावलेले जाळे व मोके वाहून जाणे) धोका असतो.

खाडीला 'वट' (ओहोटी) लागल्यावर वानकरी वानाच्या जागी जातात. जिथे 'खाडीची तड' (किनाऱ्याची जमीन) संपूर्ण तानात कोरडी राहिली असेल अशा ठिकाणी वानाची अंतिम टोके निश्चित केली जातात. 'वान' सर्वसाधारणपणे अर्धगोलाकार असते. वानाचे १) 'पुळणीचे (वाळूचे) 'वान' आणि २) 'चिखलाचे 'वान' असे दोन प्रकार आहेत. शिरगाव खाडीपट्ट्यात चिखलाचे 'वान' लावले जाते. यात एक वानकरी जाळे सोडवत आणि ते जमिनीवर पांघरत खाडीत पुढे जातो. दुसरा वानकरी जाळीच्या 'खालच्या शेवेवर' (जमिनीकडच्या टोकावर) मोके रोवत पुढे जातो. तिसरा वानकरी जाळ्याला ताणून ते 'उदानात' (भरतीच्या वेळी) वाहून जाऊ नये म्हणून त्यावर दगड ठेवत पुढे जातो. चौथा माणूस जाळ्याच्या वर उचलल्या जाणाऱ्या शेवेवर दगड ठेवत जातो. काहीवेळा वानाच्या क्षेत्रातील चिखलाची जागा समतल बनविण्यासाठी एखादा वानकरी फावडे घेऊन असतो. वानाच्या आकारमानाप्रमाणे एक ते दोन दिवसांत ही प्रक्रिया पार पाडली जाते. यास 'वान घोरणे' असे म्हणतात. एकादशी वा पाणी सुकण्याच्या निश्चित दिवसाआधी वान घोरले जाते.

खाडीत समुद्राच्या भरतीचे पाणी पूर्ण क्षमतेने शिरले की वट लागायच्या १५ ते २० मिनिटे अगोदर दोन वानकरी कमरेला बांधलेल्या 'झाबली'त (गारफेल

आहोत. जिल्हाकेंद्रापासून अवघ्या चार किलोमीटरवर शीळ नदीच्या खाडीपात्राशेजारी हे गाव वसलेले आहे. या खाडीपट्ट्यात भंडारी समाजासह, दालदी आणि खारवी या मच्छीमार समाजाचीही वस्ती आहे. मात्र 'वान' फक्त भंडारी समाजाकडूनच लावले जाते. अन्य कोणताही मच्छीमार समाज 'वान' लावत नाही. म्हणून हे केवळ भंडाऱ्यांचे समाजविशिष्ट तंत्र आहे असे म्हणावे लागेल.

समुद्रात रोज दोनवेळा भरती आणि दोनवेळा ओहोटी येत असते. त्यानुसार खाडीमध्ये दोनवेळा पाणी भरते आणि दोनवेळा सुकते. चंद्राच्या कलेप्रमाणे या भरती ओहोटीचे प्रमाण कमी-जास्त होत असते. या भरती आणि ओहोटीच्या चक्राला भंडारी समाजाच्या बोलीत 'तान' असे संबोधले जाते. या तानावरच पारंपरिक 'वान' लावण्याचे वेळापत्रक अवलंबून असते. 'वान' म्हणजे विशिष्ट क्षेत्र निर्धारित करून तेथे विशिष्ट प्रकारे जाळे लावून मासेमारी करणे.

'वान'मध्ये मासेमारी करणाऱ्या मच्छिमारांना 'वानकरी' म्हणतात. 'वान' लावण्याची प्रक्रिया ही चंद्रकलेवर अवलंबून आहे. 'वान' लावण्यासाठी काही पूर्वतयारीही आवश्यक असते. यामध्ये तिथीप्रमाणे 'तान' पाहिले जाते. यामध्ये पौर्णिमेनंतर येणाऱ्या तानाला 'काळोखाचं तान' आणि अमावस्येनंतर येणाऱ्या तानाला 'चांदण्याचं तान' असे म्हणतात. काळोखाच्या तानात सर्वांत मोठी भरती आणि सर्वांत मोठी ओहोटी लागत असते. तर चांदण्याच्या तानात तुलनेने कमी भरती आणि कमी ओहोटी लागते. वानकरी दोन्ही तानात 'वान' लावत असले तरी काळोखाच्या तानात ते सर्वाधिक नफा कमावतात. प्रत्येक पक्षाच्या एकादशीपासून चंद्रकलेचा समुद्रावरील प्रभाव वाढू लागतो. या प्रभावाच्या काळात एकादशी ते चतुर्थीपर्यंत वानकरी 'वान' लावून मासेमारी करतात. त्यासाठी वानकरी खाडीच्या तानावर लक्ष ठेवतात. त्याला 'तान पाहणे' असे म्हणतात. यामध्ये भरतीच्या वेळी खाडीचे पाणी कोणत्या मर्यादेपर्यंत किनाऱ्यावर चढले होते आणि येत्या काळात ते किती चढू शकेल याचा अंदाज घेतला जातो. हा अंदाज घेतल्यानंतर नवमी किंवा दशमीला खाडीत 'वान' रोवले जाते. त्यास 'वान घोरणे' असे म्हटले जाते. एका वानात चार ते पाच वानकरी काम करतात. त्यांच्यावर जबाबदारी दिलेली असते.

१) वानापर्यंत 'गारफेल' वाहून नेणे (गारफेल : जाड नायलॉनपासून बनविण्यात आलेले जाळे) यात १५ वावांची २५ जाळी वापरली जातात. एक 'वाव' म्हणजे खांद्याच्या रेषेत दोन्ही हात पसरून होईल तेवढे माप. या जाळ्याची उंची ६ फूट असते.

२) मोक्याच्या भारी वाहून नेणे ('मोका' : कांदळवन अथवा चिपीच्या झाडाचे १० फूट उंच सरळ सोटे) 'वान' सुमारे ८ दिवस खाऱ्या पाण्यात राहणार असल्याने मोके कुजू नयेत म्हणून खारफुटी झाडांचेच मोके वापरले जातात. एका वानात किमान दीडशे मोके वापरले जातात. वानाच्या क्षेत्रानुसार मोक्यांची संख्या वाढू शकते .
३) खाडीतून प्रत्येकी तीन ते साडेतीन किलो वजनाचे ३००-४०० दगड गोळा करणे.
४) 'वान' कोंडात लावायचं की तोकड्या पाण्यात लावायचं तसेच 'वान' किती दिवस लावायचे याचा विचार करून जागेची निश्चिती करणे ('कोंड' : पाण्याच्या सततच्या प्रवाहामुळे पात्रात तयार झालेली खोलगट जागा. अशा ठिकाणी उत्तम मासेमारी होते. मात्र अशा ठिकाणी 'वटाच्या' म्हणजेच ओहोटीच्या वेळा मर्यादित असतात.) अशी कामांची विभागणी केलेली असते. काहीवेळा 'पायरव' लक्षात घेऊन जागा निवडतात. (पायरव : ठरावीक मासे किनाऱ्याजवळ येण्याचा हंगाम) काहीवेळा ऋतुमानानुसार सोयीच्या जागी 'वान' लावले जाते. कारण मोठ्या पावसाच्या दरम्यान 'वान' व्हावण्याचा' ('वान'साठी लावलेले जाळे व मोके वाहून जाणे) धोका असतो.

खाडीला 'वट' (ओहोटी) लागल्यावर वानकरी वानाच्या जागी जातात. जिथे 'खाडीची तड' (किनाऱ्याची जमीन) संपूर्ण तानात कोरडी राहिली असेल अशा ठिकाणी वानाची अंतिम टोके निश्चित केली जातात. 'वान' सर्वसाधारणपणे अर्धगोलाकार असते. वानाचे १) 'पुळणीचे (वाळूचे) 'वान' आणि २) 'चिखलाचे 'वान' असे दोन प्रकार आहेत. शिरगाव खाडीपट्ट्यात चिखलाचे 'वान' लावले जाते. यात एक वानकरी जाळे सोडवत आणि ते जमिनीवर पांघरत खाडीत पुढे जातो. दुसरा वानकरी जाळीच्या 'खालच्या शेवेवर' (जमिनीकडच्या टोकावर) मोके रोवत पुढे जातो. तिसरा वानकरी जाळ्याला ताणून ते 'उदानात' (भरतीच्या वेळी) वाहून जाऊ नये म्हणून त्यावर दगड ठेवत पुढे जातो. चौथा माणूस जाळ्याच्या वर उचलल्या जाणाऱ्या शेवेवर दगड ठेवत जातो. काहीवेळा वानाच्या क्षेत्रातील चिखलाची जागा समतल बनविण्यासाठी एखादा वानकरी फावडे घेऊन असतो. वानाच्या आकारमानाप्रमाणे एक ते दोन दिवसांत ही प्रक्रिया पार पाडली जाते. यास 'वान घोरणे' असे म्हणतात. एकादशी वा पाणी सुकण्याच्या निश्चित दिवसाआधी वान घोरले जाते.

खाडीत समुद्राच्या भरतीचे पाणी पूर्ण क्षमतेने शिरले की वट लागायच्या १५ ते २० मिनिटे अगोदर दोन वानकरी कमरेला बांधलेल्या 'झाबली'त (गारफेल





अनुक्रमणिका

जाळ्यापासून बनवलेली छोटी पिशवी), 'घुब्या' (नायलॉनच्या दोरीचे गाठ मारता येईल एवढे तुकडे) घेऊन पाण्यात उतरतात. एक वानकरी गारफेलच्या वरच्या शेवेवर ठेवलेला दगड बाजूला करून जाळे वर उचलतो. तर दुसरा वानकरी घुब्यांच्या साहाय्याने जाळे मोक्याला बांधतो. या प्रक्रियेला 'वान उठवणे' असे म्हणतात. अशाप्रकारे अर्ध्या तासात 'वान' उठवून वानाची जागा अर्धगोलाकृती घेरली जाते. त्यानंतर वानकरी मोठ्या 'झाबल्या', 'हारे' (बांबूपासून बनविलेल्या टोपल्या), 'झिला' (दोन दांड्यांचा कोन करून त्याला बांधलेली जाळी), वेळ रात्रीची असल्यास गॅसबत्ती घेऊन वानात मासे पकडण्यासाठी उतरतात. जसजसे पाणी उतरू लागते, तसे पाण्याच्या पातळीइतके जाळे खाली उतरवले जाते. अशाप्रकारे पूर्ण 'वान' सुकत आले, की तेजीने मासे पकडावे लागतात. कारण पूर्ण वट लागल्यावर लगेच नवीन उदानाची वेळ सुरू होणार असते. अशावेळी वानकरी दोन्ही बाजूने झिलाच्या साहाय्याने मासे गोळा करत येतात.

पूर्ण वट लागल्यावर नव्या उदानाचे पाणी वानात भरण्यापूर्वी एक वानकरी जाळे व्यवस्थित बसले आहे ना, याची खात्री करून घेण्यासाठी फेरी मारतो. उरलेले वानकरी माशांच्या विक्रीसाठी आवश्यक वाहतूक आदींची व्यवस्था पाहतात. काहीवेळा वानकऱ्यांचे मासे पकडून समाधान झाल्यानंतर 'वान' लावण्यात सहभागी नसलेले काही लोकसुद्धा आपापले मासेमारीचे साहित्य घेऊन मासे पकडण्यासाठी (थोडक्यात चोरण्यासाठी) वानात येतात त्यांना 'उलगी' असे म्हणतात. काहीवेळा वानात जास्त मासे आल्यास वानकरी उलग्यांना मासे पकडण्यास बोलावतात. त्यास 'वान उलगावणे' असे म्हणतात. काहीवेळा उलगी वानकऱ्यांना मासे पकडण्यात मदत करतात आणि त्यातून आपला वाटा घेतात.

वानात वेगवेगळ्या प्रकारचे मासे मिळतात. विक्रीकरता त्यांचे वर्गीकरण केले जाते. त्यातील काही मासे कोरड्यासासाठी वेगळे काढले जातात. माशांच्या विक्रीनंतर आलेल्या पैशांचे जाळ्याचे दोन आणि वानकऱ्यांचे प्रत्येकी एक अशाप्रकारे वाटे केले जातात. त्यानुसार मोबदला वाटून घेतला जातो. काहीवेळा जर होडी वापरण्यात आली असली तर होडीचाही वाटा काढला जातो. हे चक्र एकादशी ते पंचमीपर्यंत चालू राहते. यामध्ये प्रत्येक दिवसात एकदा 'वान' उठवले जाते. ही आठवडाभर चालणारी प्रक्रिया आहे.

(नकाशा आणि अन्य संदर्भ यासाठी मुखपृष्ठ ३ = पृष्ठ ७९ पाहावे.)

**संदर्भ** -

## शिवीतील मातृभाषा

विजय नगरकर

"गाल्यते (विकृतिं याति मनः श्रवणमात्रेण) इति।
गालिः=अप्रियं वचः शापः वा॥"

मानवी जीवनात राग, लोभ, मोह या क्षणी तीव्र भावना उद्दीपित होतात. मनातील भावना सहजरीत्या प्रवाही मातृभाषेत प्रकट होतात. मातृभाषेतील शब्द रचना, संवाद, लालित्य व शब्दबद्ध साजसज्जा चकित करणारी असते.

दिल्ली विद्यापीठातील प्रख्यात भाषातज्ज्ञ, विद्वान लेखक डॉ० भोलानाथ तिवारी यांनी पीएच०डी० प्रबंधाकरता स्थानिक हिंदी बोलीच्या अभ्यासाच्या उद्देशाने, कजागिस्तान व उझबेकिस्तान या देशांचा दौरा केला. तेथे जैन, शीख आणि उत्तर भारतीय लोकांच्या संपर्कामुळे विशिष्ट संमिश्र हिंदी बोलीभाषा प्रचलित झाली आहे.

तेथे एका गावी त्यांना दोन महिला भांडण करताना दिसल्या, तेव्हा ते तेथेच थांबले. रशियन दुभाषी त्यांना म्हणाला, "आपण येथून निघू या, लोक आपल्याकडे पाहत आहेत." डॉ० भोलानाथ तिवारी हटून तेथेच थांबले. त्या भांडणात, एका शिवीमुळे दुसरी महिला ढसाढसा रडली. डॉ० भोलानाथ तिवारी यांनी दुभाषी मित्राला विचारले, "ही हृदयाला इतकी लागणारी कोणती जहरी शिवी आहे? ज्यामुळे ती महिला तत्काळ रडू लागली? मी आतापर्यंत भारतातील अनेक प्रांतातील शिव्यांचा अभ्यास केला आहे, परंतु या शिवीत अफाट शक्ती आहे, असे दिसते. आमच्या भारतीय महिला एका शिवीत अजिबात हार मानत नाहीत."

तेव्हा दुभाषी मित्र म्हणाला, "नको! ती शिवी आम्ही ऐकतसुद्धा नाही, खूप विषारी शाप आहे." तुम्ही भाषेचे अभ्यासक आहात, याकरता सांगतो की या शिवीचा येथील स्थानिक भाषेतील अर्थ आहे, "तुझा मुलगा मोठा झाला की, तू शिकवलेली भाषा विसरून जावो!"

ज्या आईने मातृभाषा शिकवली तीच जर आपण विसरून गेलो, की आपला परिवार, समाज, विद्या व देशाशी संबंध तुटतो. मातृभाषा विसरणे यासारखा दुसरा मोठा कोणताही शाप या देशात नाही. ⬢





अनुक्रमणिका

# आगरी बोली आणि माय मराठी : आंतरिक नातं!

अपर्णा महाजन

भाषा हा एक कुतूहलाचा विषय असतो. अगदी त्या भाषेचं नाव असं का पडलं इथपासून आपला अनुभव व्यक्त करण्यासाठी जवळचे वाटणारे शब्द कसे जन्माला आले, त्यातली मानवी अभिव्यक्ती; या साऱ्यांचा अभ्यास करणं हा प्रत्येक भाषेनुसार वेगळा अनुभव आहे. माणसाची गरज म्हणून भाषेची निर्मिती झाली. जिथे पाणी आहे तिथे माणसाची वस्ती आहे आणि जिथे माणूस आहे, तिथे तिथे विचारांची, भावनांची देवाणघेवाण आहे. यातूनच संस्कृती तयार होते. मग चित्र, शिलालेख, भाषा/साहित्य यातून त्या संस्कृतीची जपणूक व्हावी, असे वाटते.

आगरी भाषेबद्दल असेच कुतूहल माझ्या मनात निर्माण झाले. 'आगरी' असं नाव का पडलं असेल या भाषेला, आगरी जात आहे की भाषा, कोळी आणि आगरी वेगळे का? या भाषेची वैशिष्ट्ये कोणती? अशी माझी एक प्रश्नावलीच तयार झाली. काही लेख, पुस्तके हाती आली. पण नुसत्या वाचनापेक्षा ही भाषा जवळून, लांबून माहीत असलेल्या माणसांशी प्रत्यक्ष बोलून, जाणून घेण्याचा मला मोह झाला. आपल्या भाषेबद्दल, ती मातृभाषा नसणाऱ्या कोणाला इतकी उत्सुकता आहे म्हणल्यावर बऱ्याचशा आगरी बांधवांनी आपल्या भाषेबद्दल माहिती देणारे लेख पाठवले, मासिकं पाठवली, गप्पा मारल्या, पत्रे लिहिली आणि मग मला ही भाषा समजून घेण्यास अधिक उत्साह आला.

बोली आणि प्रमाणभाषा हा वाद इथेही होता आणि आहे. आगरी समाजातल्या शिक्षित लोकांपैकी बऱ्याचशा माणसांना आगरी भाषा नीट बोलता येत नाही. समजते. कारण त्यांच्या घरातले शिक्षित लोक त्यांना प्रमाण मराठीतून बोलायला सांगतात. प्रमाणभाषा, प्रादेशिक भाषा, बोली भाषा यात श्रेष्ठकनिष्ठत्व कल्पून शालेय मुलांना आपल्या बोलीपासून वंचित ठेवणारे, प्रमाणभाषाच अधिक चांगली आहे असा विचार रुजवणारे शिक्षणक्षेत्र आणि त्यामुळे तयार झालेले सामाजिक संकेतच कारणीभूत ठरतात, असे वाटून विलक्षण वाईट वाटले. आपल्याला इंग्रजी फाडफाड बोलता आले तरच आपण स्मार्ट, असे अनेकांना वाटते. म्हणून तर दुर्दैवानं इंग्रजी माध्यमांच्या शाळांना ऊत आला. आधी पालकांना आणि मग त्यामुळे पाल्यांना आपली भाषा बोलण्याची लाज वाटू लागली. इंग्रजी येत नसेल तर हिंदी बोलण्याकडे कल. अगदी असेच आगरी भाषेबद्दलही झाले.

आगरी बोली ही उत्तर कोकणातली प्रादेशिक बोलीभाषा आहे. त्यांची

बोलण्याची रीत, रीतीरिवाज याचं एक वैशिष्ट्य आहे. हा समाज, ठाणे, रायगड, इगतपुरी, रत्नागिरी आणि अलिबाग अशा ठिकाणी विखुरला आहे. तिथल्या तिथल्या प्रादेशिकतेनुसार, रीतीरिवाजानुसार, आगरी बोलीत थोडेफार बदलही झाले आहेत. या समाजाची लोकसंस्कृती मौखिक परंपरेने जतन झाली आहे. स्वाभाविकपणेच आगरी भाषा लिखित स्वरूपात फारशी दिसत नाही. प्रामुख्याने मौखिक संदेशातूनच संदेश देवाणघेवाणीचा व्यवहार चालत असे.

हल्लीच्या काळात जसे अनुभवातून शिक्षण देण्याचे, घेण्याचे प्रयोग होतात, तसं, आगरी समाजात, आलेल्या अनुभवांचं, वेगवेगळ्या म्हणी, लोकगीतं, लोककथेतून झालेल्या अभिव्यक्तीतून आगरी समाजाच्या विचारसरणीचं, अनुभवाचं लख्ख प्रतिबिंब दिसतं. मुलीच्या जन्माला आल्याचं दुःख एका लोकगीतात दिसतं. लग्न झाल्यावर गरिबीच्या काहिलीत चटके सोसणारी एक सासुरवाशीण माहेरच्या मदतीची वाट पाहत बसलीय. तिला होळीच्या सणाला आपल्या माहेरी निरोप पाठवायचा आहे. एका वाटसरूला ती आपल्या माहेरचा पत्ता सांगतेय.

“आयबाच्या घराला रं; भिंती गुल्लालाच्या रं
आयबाचे घराची बंबना(वासे) चंदुनाची रं,
आयबाचे घराची शिवना(छप्पर) दवन्याची रं.
आयबाचे घराची रं पाचुबंदी अंगना रं.”

कोणत्याही भाषेतल्या साहित्यात; मानवी मनाचं, भावभावनांचं, विचारांचं प्रकटीकरण एकसारखंच होत असतं. पण प्रत्येक भाषेचे स्वतःचे व्यक्तिमत्त्व असते, स्वभाव असतो. आगरीही त्याला अपवाद नाही. आगरी हे नाव त्यांच्या उद्योगांमुळे, कामांमुळे पडलं. समुद्राच्या किनारी, विशेषतः खाडीच्या प्रदेशात मीठ तयार करण्यासाठी आगरे तयार करतात. त्या आगरात काम करणारे म्हणून आगरी. आगर या शब्दाचा अर्थ मळा किंवा शेत असादेखील आहे.

समुद्राचे भरती-ओहोटीचे पाणी ज्या मंद उतारावर येते आणि जाते त्याला आंतरभरती विभाग म्हणतात. इथे, आगरी लोकांनी, समुद्राच्या खाऱ्या पाण्याला बांध घातले. मीठ पिकवले. नंतर खाऱ्या जमिनीत पावसाच्या पाण्यापासून गोडेपणा निर्माण करून तिथं भातशेती केली. उधाणाच्या भरतीपासून भातशेतीला प्राणपणाने जपले. अनेक वर्षांच्या अथक मेहनतीनंतर ही भातशेती नियमित झाली. अशा आगरांना भाताचे, मिठाचे खाचर असेही म्हणतात. समुद्राच्या आसपास राहणारे हे सारे लोक. त्यांचा व्यवसाय मिळता-जुळता असला, तरी त्यांच्यात पुन्हा फरक

आहेतच. मिठागरे करणारे आगरी त्यांना खारवी म्हणतात, मासेमारी करणारे ते कोळी. हे केवळ मासेमारी करतात. खाडीकिनारी राहून, खाडी-समुद्रात मासेमारी करणारे ते भोई. आगरी समाज आणि त्याच्या परिघातल्या इतर जातींबद्दल वाचताना, जसे, कालवं, शिंपले, तिसऱ्या, कोलंबी अशा 'सी फूड' चे ठरावीक ठिकाणी समूह सापडतात, तसे मला हे दर्यावर्दी समूह असावेत असे वाटते. हा दर्यावर्दी आगरी समाज मौखिक संदेशासाठी ही भाषा वापरत असे. त्यात 'प्रमाण' उच्चारस्पष्टता नेमकी नाही. बोलणे अनुनासिक आणि थोडे वेगात असते.

'आगरी बोली' ही प्राकृत समूहातली बोली आहे. "यादवकाळात हरलेल्या शिलाहारांनी यादवकालीन संस्कृती स्वीकारली. त्यामुळे आगरी बोली प्राकृत आणि यादवकालीन भाषेस खूप जवळची आहे." (पाटील, २०१९) उदाहरणार्थ, यरव्ही (प्रा.)- यरवी (आ.बो) - एरव्ही (मराठी) / पांख- पख - पंख

या बोलीभाषेची अनेक वैशिष्ट्ये आहेत. ही भाषा समजून घेताना, एखादं शब्दकोडं उलगडण्याचा आनंद मला मिळत होता.

१) क्रियापदाच्या प्रथमपुरुषी रूपात लिंगभेद नाहीत.

उदाहरणार्थ, मी/आम्ही आलू. मी खातंय/ जातंय.

२) अनुनासिकतेमुळे बरेच शब्द अनुस्वरीत उच्चारले जातात. उदाहरणार्थ, सांगसाठी सांगले, माग-मांगले, उद्याला-उंद्याना, कमरेचा-कंबरेचा.

३) मात्र काही ठिकाणी याच्या उलटही घडते. नेहमी वापरले जाणारे अनुस्वार काढून टाकले जातात. उदाहरणार्थ, सुंठ-सुठ, चिंच-चिच, गुंफा-गुफा.

४) 'ग'च्या ठिकाणी 'ज' वापरतात. जसे, गेलासाठी जेला/ज्येला.

५) 'घ'च्या ठिकाणी 'झ', उदाहरणार्थ, घ्या-झ्या.

६) 'ड' च्या ठिकाणी 'र' उदाहरणार्थ, उडाला-उराला.

७) 'र' च्या ठिकाणी 'ड', उदाहरणार्थ, वारा-वाडा.

८) 'मी'च्या ऐवजी 'मीनी' लिहितात / बोलतात.

९) काही शब्दांचे उच्चार - कशाला - कायला/ कयाला, कशाशीला कायशी / कयाशी, दुसरा - बिसरा, दुसऱ्याने - बिसरून. मुंबई- उंबय, ह्यांगाला - या अंगाला/ बाजूला, त्यांघाला - त्या अंगाला, कह्यां/ खंय म्हणजे कोठे, कन्हाला - कशाला. जापणे म्हणजे बोलणे, अंड्याला कवट (आणि अनेकवचनी कवटा)

१०) आदराने एखाद्याला बोलवायचे असेल तर 'स' प्रत्यय लावला की झाले. उदाहरणार्थ ,बापूस, दादूस. म्हणजे 'स' हा प्रत्यय आदरार्थी पुल्लिंगी आहे तर सा हा





अनुक्रमणिका

आदरार्थी स्त्रीलिंगी आहे उदाहरणार्थ , काकीसा, बाईसा.

११) लग्न न झालेल्याला किंवा झालेलीला आठवार तर लग्न झालेल्याला अथवा झालेलीला नववार म्हणतात.

१२) ज्ञानेश्वरीतले कित्येक शब्द आगरी भाषेत आजही वापरत आहेत असे 'खाडीची शेती व जीवनशैली' या निबंधात म्हटले आहे. उदाहरणार्थ, मेर म्हणजे कडा, लांबा म्हणजे गेल्या वर्षीच्या पिकातील गळून पडलेल्या दाण्यांपासून तयार झालेले रोप किंवा चालू पिकातील उशिरा उगवलेले रोप. मांद म्हणजे भाताची रास, हीर म्हणजे लहान फांदी, रांधणे- स्वयंपाक करणे, उमाप- खूप.

सामाजिक स्तरावर या भाषेला काय स्थान आहे? असा मला प्रश्न पडला आणि मराठीप्रमाणेच मला याबद्दल प्रतिक्रिया मिळाल्या.

"खेड्यातल्या अशिक्षित माणसालासुद्धा इंग्रजीचे आकर्षण वाटत आहे. हा सांस्कृतिक बदल आहे. पाश्चात्य संस्कृतीचे प्रमाणापेक्षा अधिक अवलंबन केल्यामुळे आपली संस्कृती आणि श्रद्धा नष्ट होण्याच्या मार्गावर आहेत. नव्या पिढीला आपली बोली ग्राम्य आणि गावंढळ वाटते आहे" (आगरी बोली, पान ५)

शिक्षणानंतर इतर समाजाच्या संपर्कात आलेल्या लोकांच्या मनात सर्वसाधारणपणे आपल्या बोलीबद्दल कमीपणाची भावना असते. अशिक्षित लोकांच्या मनात अशी भावना नसते आणि शिकूनही आपल्याच समाजात राहावे लागलेल्या लोकांच्या मनात कमीपणाची भावना सुप्तपणे असते. त्यामुळे आपल्या बोलीबद्दल ते अभिमान बाळगताना दिसत नाहीत.

प्रमाणभाषा ही कोणाची? तर समृद्ध समाजाची! वेगवेगळ्या समाजातल्या लोकांना व्यावहारिक संपर्कात राहायचे असेल, तर प्रमाणभाषा आवश्यक असतेच असते. पण ती प्रमाणभाषा नीट न आल्याने बोली बोलणारे लोक मनात उगाचच न्यूनगंड बाळगतात. जसे इंग्रजी/ हिंदी भाषक आजूबाजूला असतील तर मराठी भाषकांची दुर्दैवानं अशीच अवस्था होते. अशा प्रकारच्या न्यूनगंडातून, इंग्रजी आणि ती येत नसेल तर हिंदी बोलण्याकडे लोकांचा ओढा दिसतो. वास्तविक भाषा येत नाही यात कमीपणा, अडाणीपणा वाटण्याची काय गरज? पण तो वाटतो, हे सामाजिक सत्य आहे. बोलीभाषेतून मानवी मनाची जिवंत स्पंदने जाणवतात. मानवी भावभावनांचे खरे स्वरूप दिसते. जसा रासायनिक खत आणि सेंद्रिय खत यांमध्ये फरक आहे तसा. हे फक्त आगरी बोलीपुरते मर्यादित आहे असं मुळीच नाही. पण सगळ्या बोलीबाबत हे खरे आहे. मराठीचे स्थानपरत्वे भेद असणाऱ्या अनेक बोली





अनुक्रमणिका

अस्तित्वात आहेत. कोकणातील मालवणी, दस-आगरी, वाडवळी, कोळी, मांगेली, बाणकोटी, कुणबी, चित्पावनी, संगमेश्वरी, देवरुखी, गोवा, कारवारी. खानदेशची खानदेशी, अहिराणी, लेवा वगैरे. या प्रत्येक बोलीत कमी शब्दांमध्ये, मोठा आशय व्यक्त करण्याचे सामर्थ्य आहेच.

आगरी भाषा लोप पावू नये म्हणून त्या समाजाचे अनेक लोक प्रयत्न करत आहेत. त्यांची साहित्य संमेलने होतात. मौखिक माध्यमातून मिळालेला आगरी भाषेचा ठेवा देवनागरी लिपीतून त्यांनी लिहून ठेवला आहे. या भाषेतली आणखी एक गंमत म्हणजे यात जोडाक्षरी शब्द दिसत नाहीत. त्यामुळे ते सुटसुटीत वाटतात. उदाहरणार्थ, प्रत्येक - परतेक; प्रमोद- परमोद. आगरी लोक भाषेतलं अवघडलेपण टाळून बोलतात. त्याचा शुद्ध-अशुद्धतेशी फारसा संबंध ते जोडत नाहीत. जसे, नथ - नत, बाण - बान, रात्र - रात, रात्रीला-रातीला, पाणी-पानी, राहतो-ऱ्हातू, अगोदर-अदुगर अशा प्रकारचे शब्द आपल्याला आढळतात.

आगरी बोलीतील गोडवा आणि भाषासौंदर्य असलेल्या अनेक लोककथा, लोकगीते, सणांची गाणी, आगरी पुरुषांची लोकगीते, लग्नाच्या, बारशाच्या कविता आणि गाणी याखेरीज नव्या युगातली लिहिलेली नाटके, कथा, कविता हे साहित्य वाचताना, या भाषेमध्ये मराठीच्या जुन्या रूपांचा, संतसाहित्यातील मराठीचा मोठा प्रभाव आहे, हे जाणवते. तुकाराम महाराजांच्या 'जवं मोठा चाले धंदा, तवं बहीण म्हणते दादा.' या अभंगामधले जवं, तवं हे शब्द आगरी भाषेतही आहेत.

नव्या पिढीचं तरुण आगरी भाषा बोलायला लाजतात. आधुनिक आणि शिक्षित आगरी समाज वेगवेगळ्या माध्यमांमधून पुढे येऊन नव्या पिढीतल्या तरुणांच्या मनातील हा आगरी भाषेवरील अशुद्धतेचा, कमीपणाचा गंड काढून टाकायचा प्रयत्न करत आहेत. जसे आपल्याकडेही मराठी भाषा टिकावी, वाढावी तिला योग्य तो सन्मान मिळावा या पातळीवर एकेक संस्था, परिषदा कार्यरत आहेत; अगदी तसेच. मराठीतला व्हते (होते) हा शब्द आगरीमध्येही आहे. हा शब्द अप्रमाण मानला जातो. पण नव्हते हा शब्द मात्र प्रमाणभाषा स्वीकारते. नव्हतेच्या उलट व्हते; मग हा शब्द प्रमाण का मानू नये? अशी चर्चा मला ऐकायला मिळाली, हा मराठी प्रमाण आणि बोलीतील विरोधभासाचा मुद्दा ना.गो.कालेलकरांच्या 'भाषा आणि संस्कृती' या पुस्तकात सापडतो.

आगरी समाजातले शब्दधन बहुतांशी स्त्रियांमुळे जपले गेले आहे. आगरी समाजात मातृसत्ताक पद्धती पूर्वापार चालत आली आहे. पण याचा संदर्भ हल्लीच्या

'सत्ताक' या अर्थापेक्षा थोडा निराळा आहे. केवळ आपल्या देशातच नव्हे तर जगातच पुरुषप्रधानता ठायी ठायी आढळते. वडील, भाऊ, नवरा आणि मुलगा हे केवळ 'पुरुष' असल्याने, स्त्रियांना कमी, दुय्यम लेखण्याची एक परंपराच जोपासली जाते. वास्तविक पाहता, कुटुंब ही एक सामाजिक संस्था मानली, तर त्यातील सर्व घटकांना, आपल्या क्षमतेनुसार, जबाबदाऱ्या पार पाडता यायला हव्यात. हे आदर्श तत्त्व, शहरीपेक्षा ग्रामीण आगरी समाजात प्रकर्षाने दिसते. या समाजात स्त्रीला कौटुंबिक निर्णयप्रक्रियेत महत्त्वाचे स्थान असते. गृहीत तर मुळीच धरले जात नाही. लग्न ठरविण्याच्या प्रक्रियेत स्त्रीला नकाराधिकार असतो. आर्थिक निर्णयाच्या चर्चेतही तिला महत्त्वाचे स्थान असते. मात्र, सुशिक्षित शहरी आगरी लोकांमध्ये 'पुरुषप्रधान' संस्कृती आढळते. या विरोधाभासाची गंमत वाटते. स्त्रियांनी मौखिक परंपरेने, लोकगीते, म्हणी, उखाणे, वगैरे शब्दधन पुढच्या पिढीत संक्रमित केले आहे. अनेक गमतीचे प्रसंग, खेळ, चेष्टामस्करी यांची गीते मराठीप्रमाणे आगरीभाषेतही विपुल प्रमाणात आहेत. फुगडी खेळताना चिडवाचिडवी करतानाचे एक फुगडीगीत वाचल्यावर; आपल्या मराठीतही असेच एक गीत आहे, याची आठवण येईल.

'माजे चुलीवं पापोर पापोर; गंभीचा नवरा मांकोर, मांकोर

('चुलीवर भाजला पापड गं, पापड गं.. मैत्रिणीचा नवरा माकड गं, माकड गं')

जसजसे आपण आगरी भाषेतील साहित्य वाचू लागतो, तसतशी आपल्याला ती बोली उमगू लागते. आगरी बोलीत आईला 'ब' म्हणतात. म्हणून आगरी ही 'ब बोली'. आपण मराठीला 'मायमराठी' म्हणतो. आगरी व्याकरण समजून घेताघेता, या दोन बहिणीचं आतंरिक नातं असल्याची खात्री पटते.

**संदर्भ :**


१. 'आगरी बोली: लोकसंस्कृती व साहित्य परंपरा,' पाटील अविनाश, साहित्य अभिरुची प्रकाशन, २५ फेब्रुवारी, २०१८. पान क्र. ४४३.

२. 'खाडीची शेती व जीवनशैली': श्री. रवींद्र पाटील, नोव्हेंबर, २०१९.

३. 'भाषा आणि संस्कृती' ना. गो. कालेलकर, मौज प्रकाशन, १९६४.

४. आगरायन - 'ब' बोलीची काव्यचळवळ' विनोद तळेकर, २५ फेब्रुवारी, २०१८.

५. विशेष सहकार्य : प्राचार्य सुरेशचंद्र म्हात्रे, श्री. रवींद्र पाटील, प्रा. अविनाश पाटील.




# दालदी कोकणी म्हणी

निधी पटवर्धन

भारताच्या पश्चिम किनारपट्टीवर वसलेला, रत्नागिरी हा महाराष्ट्रा च्या किनारी भागातील एक जिल्हा आहे. याचा उत्तर-दक्षिण विस्तार सुमारे १८० कि.मी. तर पूर्व-पश्चिम विस्तार सुमारे ६४ कि.मी. आहे. जिल्ह्याच्या पूर्वेस सह्याद्रीच्या पर्वतरांगा. त्यापलीकडे सातारा, सांगली आणि कोल्हापूर हे जिल्हे. उत्तरेस रायगड जिल्हा, पश्चिमेस अरबी समुद्र तर दक्षिणेस सिंधुदुर्ग जिल्हा यांनी जिल्ह्याच्या सीमा निर्धारित केल्या आहेत. रत्नागिरी जिल्हा प्राकृतिकदृष्ट्या पर्वतीय क्षेत्र, पठारी क्षेत्र व किनारवर्ती क्षेत्र या तीन उपक्षेत्रांमध्ये विभागता येतो.

**रत्नागिरी किनारवर्ती क्षेत्र :** आपला अभ्यास रत्नागिरी खाडीपट्ट्यातील दालदी मच्छिमारांच्या भाषेबाबत असल्याने या किनारवर्ती क्षेत्राची ओळख व्हावयास हवी. किनारवर्ती क्षेत्र हे किनारपट्टीपासून सुमारे १०-१५ कि.मी. विस्तारलेले असून सामान्यपणे सखल मैदानी आहे. येथे अंदाजे २५०० मिलीमीटर पर्जन्यवृष्टी होते. या क्षेत्रातील बहुतांश कार्ये ही समुद्राशी संबंधित आहेत. या क्षेत्रामध्ये अनेक किनारे, खाड्या, सागरी किल्ले, बंदरे, गरम पाण्याचे झरे, गुहा, मंदिरे व इतर धार्मिक स्थळे, नैसर्गिक सौंदर्यस्थळे तसेच काही महान व्यक्तींची जन्मस्थळे आहेत. या क्षेत्रातील पर्यटनक्षेत्रांत - अंतर्गत व सागरीमार्ग, नौकानयन, नौकाविहार, जलक्रीडा उदाहरणार्थ ,वॉटरस्कूटर्स, मासेमारी, कॅम्पिंग, किनारी विश्रामगृहे, सागरी-उद्याने यांचा समावेश होतो. या जिल्ह्याची एकूण लोकसंख्या १६,९६,७७७ इतकी आहे.

प्रामुख्याने रत्नागिरी प्रांतातच आढळणारे दालदी लोक; आपले पूर्वज जहाजाने पूर्व दिशेला वळसा घालून येथे आले, अशी परंपरा सांगतात. दालदी लोकांच्या चेहऱ्यावरून आणि मुस्लिम समाजातील त्यांच्या दर्जावरून हे प्रामुख्याने धर्मांतरित हिंदू कोळी किंवा स्थलांतरित मुस्लिम किंवा गुलाम मुली यांचे वारसदार असावेत, असे सूचित होते. (संदर्भ - मेजर जर्विस यांची पश्चिम भारताची सांख्यिकी) सातव्या-आठव्या शतकात भारतात आलेल्या पहिल्या अरब वसाहतवाद्यांपैकी जे मलबार येथील मोपला जमातीशी उत्तम संबंध राखून राहिले, त्यांचे हे वंशज असावेत, असे वाटते. हे लोक उंच, मजबूत आणि धष्ट-पुष्ट पण विभिन्न व आकर्षक चेहऱ्याचे आहेत. या जमातीमधील बहुतेक स्त्रिया कृष्णवर्णी पण सुरेख आणि चांगल्या बांध्यांच्या आहेत. घरात हे लोक मराठी बोलतात. काहीजण हिंदी समजतात व बोलतात. बहुतेकांची घरे दुय्यम दर्जाच्या शाकारलेल्या झोपड्या

आहेत. काही थोडे घट्ट विजारी घालणारे पुरुष वगळता, अन्य स्त्री-पुरुष हिंदूंप्रमाणेच पोशाख वापरतात. यांच्यातील काही लोक दयावर्दी, काही शेतकरी, काही मुंबईला नोकरी-व्यवसायानिमित्त जातात, तर काहीजण जाळी विणकाम, दोऱ्या वळणे, मासेमारी इत्यादी कामे करतात. रत्नागिरी जिल्ह्यातील इतर मुस्लिम लोकांपेक्षा यांचा स्तर कनिष्ठ आहे. ते भरपूर मेहनती असून त्यांच्यातील बरेचसे कर्जबाजारी आहेत पण वर्ग म्हणून ते यथास्थित आहेत. ते सुन्नीपंथाचे असून आपल्या जमातीमध्येच विवाह करतात आणि काझींचे आदेश मानतात. अलीकडे हे लोक मुलांना शाळेत घालतात. मुंबईशिवाय हे लोक बहुतेक आखाती देशांत नोकऱ्यांसाठी जातात. दर्यावर्दी व्यवसायामुळे हे दालदी लोक आर्थिकदृष्ट्या फारसे संपन्न नाहीत. आजच्या दालदी महिलांचा पोशाख पाचवारी साडी व डोक्यावरून पदर, पंजाबी ड्रेस परंतु डोक्याला घट्ट बांधून घेतलेली ओढणी असा असतो. काहीजणी बुरखाही परिधान करतात. तर दालदी पुरुष लुंगी (काहीजण विजारी), सदरा, डोक्यावर गोलटोपी वापरतात.

**दालदी कोकणी बोलीचे भौगोलिक क्षेत्र:** ज्या प्रदेशातील बोलींचा अभ्यास करायचा असेल तेथील लोकांच्या बोलण्यातील विविध प्रयोगांचा वापर कोठे कोठे होतो, याची नोंद करायची आणि समान प्रयोग वापरणारी ठिकाणे नकाशावर जोडून बोलींच्या क्षेत्रमर्यादा निश्चित करायच्या, ही बोलीच्या अभ्यासाची प्रमुख पद्धती मानली जाते. याच्या आधारे 'भाषिक नकाशा' तयार करावा लागतो. ही दालदी भाषा रत्नागिरीच्या आसपासच्या खाडीपट्ट्यात बोलली जाते. स्थान - मिरकरवाडा, भाटकरवाडा, राजीवडा, कर्ला ते सोमेश्वर (१३ कि.मी) खाडीपलीकडे नवानगर, भाट्ये, जुना फणसोप, नवा फणसोप, गोळप, पावस, पूर्णगड, गावखडी (२५/३० कि.मी.) या रत्नागिरी भागात तसेच दाभोळ, गुहागर, जयगड, गणपतीपुळे, मिऱ्या, पावस, पूर्णगड ते जैतापूर या भागांत कमी-अधिक फरकाने ही भाषा बोलली जाते. प्रस्तुत लेखाचा अभ्यासविषय झालेली दालदी बोली ही रत्नागिरी जिल्ह्यातील खाडीपट्ट्यातील व्यापक क्षेत्रमर्यादेत बोलल्या जाणाऱ्या बोलीचे रूप व्यक्त करीत असली तरी या लेखात मी प्राधान्याने खुद्द रत्नागिरी खाडीपट्ट्यातील भाषाच विचारात घेतली आहे. या खाडीपट्ट्यात प्रत्यक्ष फिरून तेथील स्त्री-पुरुषांकडून प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीने मी 'भाषिक साहित्य' गोळा केले आहे. आजपर्यंत वावरलेल्या लोकांच्या संचित ज्ञानाचा कोश म्हणजे म्हणी. त्यामुळे म्हणींच्या रूपाने भाषा ही आपल्या संस्कृतीचा वारसा घेऊन वृद्धिंगत होत असते. अल्पाक्षरत्व, व्यावहारिकता,

चटकदारपणा, लोकमान्यता हे चार गुण तर म्हणीत असतातच. ज्यात काही अनुभव, उपदेश, माहिती, सार्वकालिक ज्ञान किंवा सत्य गोवलेले असते ते वारंवार वापरात येणारे चटकदार लघुवाक्य म्हणजे 'म्हण' होय. म्हणीवरून भाषेचा गूढ स्वभाव समजतो.

०१. अल्लाच्या घरात देर हाय पन अंधेर नाय - शेवटी न्याय हा मिळतोच.

०२. अल्लानी दिले नूर कवा नाय झायलो दूर - नैसर्गिक सौंदर्याला कधीच बाध येत नाही.

०३. आता आयलो हाय ऊंट डोंगराच्या खाल - समज येणे.

०४. आपल्या गळीत कुत्रो पण शेर - आपल्या गल्लीत वा मोहल्ल्यात सर्व लोक बहादुरी दाखवतात, दुसरीकडे नाही.

०५. आयस तसा धुवस, बापूस तसो पुतूस - (खाण तशी माती) आईबापाप्रमाणेच मुले निपजतात.

०६. आलशाला कामा तीन - कामचोर असणे.

०७. इस्त्री टाट ना खिशात नाय झाट - परिस्थिती नसताना फक्त दिखावा करणे.

०८. उपरी / औंढ्या घड्यावर पाणी - (पालथ्या घड्यावर पाणी) कितीही उपदेश केला तरी काहीही उपयोग न होणे.

०९. करज ते करज पन दोन घास सरस - ऐपतीपेक्षा जास्त चंगळ करणे.

१०. काक्यात कलस गावाला वलस - जवळच्या वस्तूची गावभर शोधाशोध करणे.

११. कामा पुरतो मामा - गरजेपुरते गोड बोलणे.

१२. काय नाय खबर, वाटनीला बराबर : आपल्या फायद्यावेळी नेमके हजर असणे.

१३. किती मारलास तरी कुत्रेची शेपटी वाकडीच - मूळ स्वभावधर्म बदलत नाही.

१४. खातय दानो करतय उदानो - वाजवीपेक्षा जास्त खर्च करणे.

१५. खुदस मर आनि खुदस जन्नत बघ - स्वत: मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाही.

१६. गावातली न्हवरी पादरी - } घरातील वस्तूचा वा व्यक्तीचा

१७. घरची कोंबडी दाल बराबर } - उचित आदर होत नाही.

१८. घातले वीस आनि कारले तीस - काहीही हिशोब नसणे.

१९. घे सुरी आनि मार उडी - कोणत्याही बाबतीत अकारण घाई करणे.

२०. चाय त्याची न्याय - ज्याचे खायचे त्याच्याच बाजूने राहावयाचे.

२१. चाऱ्यान्याची कोंबडी बारान्याचो मसालो - वाजवीपेक्षा जास्त खर्च करणे.

२२. चोराची नजर मोक्यावर - संधीवर नजर ठेवून असणे.

२३. चोराच्या दाढीत तिनको - वाईट कृत्य करणाऱ्याला ते उघडकीस येईल की काय याची सतत भीती वाटते. (चोराच्या मनात चांदणं)
२४. जरासा दुकना गावभर फुकना - छोट्या गोष्टीचादेखील बाऊ करणे.
२५. जसा करूचा तसा भरूचा - जसे कर्म तसे फळ मिळते. (करावे तसे भरावे)
२६. जात दशी बात/कात - शेवटी मनुष्य जातीनुसारच वागतो.
२७. झोटीयांच्या हंडीला कवाच बरकत नाय - खोटेपणाला कधीच यश मिळत नाही.
२८. झगामगा नी मालाच बगा - प्रदर्शन करणे.
२९. तीगांची मसलत नी बान गेलो कोसलत - काहीही निर्णय होऊ न शकणे.
३०. दिस गेलो हलत मालत, रात गेली हलत डुलत - सुस्तीमुळे काही काम न होणे.
३१. दोगांच्या भांडणात तिसऱ्याचो फायदो - दोघांच्या भांडणात तिसऱ्याचा लाभ
३२. नकटा नाका हळूच कापा - आधी राग/ नखरे दाखवणे परंतु नंतर शांत होणे.
३३. नाचता येयना आंगना तोकरा - काम न करण्यासाठी बहाणे शोधणे.
३४. नैय मामूसे नकटा मामू अच्छा - काही नसण्यापेक्षा थोडे मिळाले तरी चांगले.
३५. पुढचा पाट मांगचो सपाट - काहीही लक्षात न राहणे.
३६. फनसाला पाना तीन ती तीनच - सर्वत्र परिस्थिती सारखी ('पळसाला पाने तीनच' याअर्थाची मराठी म्हण असली तरी कोकणात पळसाऐवजी फणसाचे झाडच दृश्य असल्याने या बोलीत 'फनस' शब्द आला असावा.)
३७. बेशरमची बला दूर मारे चप्पल उतरे नूर - निर्लज्ञाला वठणीवर आणण्यासाठी दंडेलीचा उपयोग करावा लागतो.
३८. भागातचो मासो नी शेपटीत कुसो } भागीदारीत कोणीच धड लक्ष दिल्याने
३९. भागीतचो बैल किवनानी मेलो - } शेवटी नुकसानच होते.
४०. भाट्या नगरी नी गावभर खबरी - चढवून बढवून गावभर गोष्टी करणे.
४१. माकर म्हंते माझो बोचो लाल - स्वत:चीच स्तुती करणे.
४२. मारी त्याची गरी -(ज्याच्या हाती ससा तो पारधी)
ज्याच्या हाती शिकार त्यालाच त्याचे श्रेय देण्यात येते.
४३. मुल्लाजीची धाव मशिदीपर्यंत - (सरड्याची धाव कुंपणापर्यंत) ज्याचे सामर्थ्य, ऐपत किंवा ताकद अत्यल्प आहे, त्याच्याकडून मर्यादितच काम होणार.
४४. मोप राग भीक मांग - अती राग रसातळाला नेतो.
४५. लात्याचे भूत बात्यान नाय मानत - चामटवृत्तीचे असणे.
४६. लांबचे ढोल सुहाने (दुरून डोंगर साजरे) - दूरवरूनच गोष्टी चांगल्या दिसतात




अनुक्रमणिका

पण जवळ गेल्यावर त्याची योग्यता कळते.

४७. शेवटी पावरा आपल्या इकरे मारती ओरते - ज्याच्या हातात सत्ता तो तिचा लाभ उठवणारच / वशिला चालवणे.

४८. हत्ती गेला शेपटी आरकली - मुख्य काम पूर्ण होऊन थोडेच शिल्लक उरणे.

४९. हत्तीचे दात दाखवचे अलग नी खावचे अलग - दाखवायला निराळे आणि प्रत्यक्षात वेगळे असणे.

५०. हस्ती प्रमाण मस्ती - ऐपतीनुसारच वागावे.

दालदी लोक थोडेबहुत सानुनासिक बोलतात. हिकरे(इकडे), झार(झाड)इत्यादी रूपांत 'ड'चा 'र' झालेला स्पष्ट आहे. वाटानो, कानपो, चिमचो, टिपको, हुदलो इत्यादी शब्दांतील 'ओ'कार स्पष्ट आहे. ही बोली पूर्णगडपुढे बदलताना दिसते. राजापूरकडे तर भाषा पूर्णच बदलते. राजीवड्यातले मुस्लिम लोक कर्ल्याची भाषा आमच्यापेक्षा वेगळी आहे, असे म्हणतात. पण हा फरक नाममात्र आहे. करूचा-केरूचा, खालू-खलय असे काही नाममात्र अपवाद सोडले तर दालदी कोकणी बोलीच इथेही बोलली जाते.

**संदर्भ** : http://ratnagiri.gov.in/dist_general/distDetails.aspx

http:// cultural.maharashtra.gov.in/english/gazetteer/RATNAGIRI

**आदिवासी भाषा आणि लिपी** : कित्येक आदिवासी भाषांना लिपी नसल्याची सार्वत्रिक तक्रार आढळते. लिपी नसल्याने भाषेचे टिकणे-टिकवणे अवघड ठरते. अशा वेळेस आदिवासी भाषांसाठी नवीन लिपी तयार करणे, ती सर्वांच्या अंगवळणी पडणे यासाठी लागणारा वेळ पाहता भाषा टिकवणे अधिकच दिव्य ठरेल. त्यावर उपाय म्हणून भारताच्या विविध राज्यांत राहणाऱ्या आदिवासींच्या भाषांना त्या त्या प्रदेशांतील भाषेसाठी वापरल्या जाणाऱ्या लिपीची जोड दिली तर ह्या भाषा टिकवण्यासाठी उपयुक्त ठरेल. म्हणजे महाराष्ट्रात राहणाऱ्यांसाठी देवनागरी, आंध्र-तेलंगणात राहणाऱ्यांसाठी तेलुगू लिपी, कर्नाटक निवासींसाठी कन्नड वापरली तर! आपल्याला काय वाटते? जरूर कळवा.

**marathi.abhyas.parishad@gmail.com**

# भारताच्या ईशान्येच्या राज्यांतील बोलीभाषा

सुनील किटकरू

युनेस्कोच्या माहितीनुसार, विश्वातील ४० टक्के लोकांना त्यांच्या मातृभाषेत शिक्षण उपलब्ध नाही. युनेस्कोच्या प्रमुख आड्रे आझोले म्हणतात, 'मुलांना लहानपणापासूनच मातृभाषेत शिक्षण मिळावयास हवे. कारण, परंपरा व सांस्कृतिक संचित, मुलांची प्रगती व ज्ञान हेच कोणत्याही शिक्षणाचे आधारस्तंभ असतात. प्रत्येकाला विविध भाषा याव्या. जेणेकरून बहुभाषिकता वृद्धिंगत होऊन शिक्षण-व्यवस्थेत समाजाच्या सर्व स्तरांचा समावेश होईल आणि निरंतर विकासाचे ध्येय साध्य होऊ शकेल.' युनेस्कोच्या धोरणानुसार, २०१९ हे वर्ष जनजाती समाजाच्या भाषा, बोलीभाषांचे संवर्धन व संरक्षणासाठी समर्पित होते तर २०२० हे वर्ष लुप्तप्राय भाषांच्या विकासासाठी होते.

भारतात मुख्यतः १२२ भाषा बोलल्या जातात. तसेच विभिन्न बोली-भाषांसकट ही संख्या १५९९ पर्यंत होते. भारतीय संविधानाने मान्यता दिलेल्या २२ भाषा आहेत, तसेच आठव्या अनुसूचीनुसार कलम ३८८ (१) व ३५१ प्रमाणे आणखी १४ भाषा समाविष्ट आहेत. त्यात ईशान्येतील असनिया, बंगाली, बोडो, मैते ह्या भाषांचा समावेश आहे. १९७१च्या जनगणनेप्रमाणे ईशान्य भारतात २२० भाषा बोलल्या जातात. या तीन भाषिक गटात मोडल्या जातात– इंडो-युरोपियन, सिनो तिबेटीयन व ऑस्ट्रिक. असमिया इंडो-युरोपियन गटात येते तर सिनो तिबेटीयन गटात; आसाममधील तिबेटी, बर्नन भाषा, बोडो, कारबी, गारो, मिशिग, राभा, डिमासा, काछारी, तिवा, देवरी ह्या भाषा तर ताई उपगटात आसाममधील ताई-अहोम, ताईपकाके, ताई-कामयांग व ताई-तुरांग ह्या भाषा येतात. मेघालयातील खासी ऑस्ट्रिक गटाचे प्रतिनिधित्व करते. तर तिबेट -बर्मन गटात; मणिपुरातील मैते, नागालॅण्डच्या आओ, अंगामी, सेमा, लोथा, कोन्याक, झमी, त्रिपुराची कोक-बराक, मिझोरामची, मिझो आणि हमार आणि अरुणाचलच्या निशी, आदि, नोकटे, आपातानी, मिशिमी ह्या भाषा आढळतात.

'नागामीज' ही असमिया व नागा बोलीभाषांचे मिश्रण असणारी तर अरुणाचल प्रदेशात हिंदी आणि असमियाचे मिश्रणाने 'अरुणाचलीस' अशा काही मिश्रभाषादेखील तयार झालेल्या दिसतात. बोडो भाषेची अधिकृत लिपी देवनागरी होय. ख्रिस्ती प्रचारकांच्या प्रयत्नांमुळे त्रिपुराच्या कोकबराकला रोमन लिपी मिळाली,

असाच प्रयत्न त्यांनी ख्रिस्ती नेतृत्वामार्फत बोडो भाषेसाठीदेखील केला पण तो असफल ठरला.

असमिया भाषेत 'श', 'ष', 'स' चा उच्चार 'ह' असा होतो. त्यामुळे साधुचे 'हाधु', 'शिशु'चे 'हीहुँ' उच्चारण होते. काही ठिकाणी 'ष' चा 'ख'देखील होतो. त्यामुळे 'विषय'चे 'विखय' होते. असामियां भाषेत पिण्यास खाणे म्हणतात त्यामुळे 'जल पितो'चे 'जल खातो' होते. परंतु अरुणाचली हिंदीत बोलताना, हम चाय खायेगा, पानी खायेगा, अशी गंमतजंमत कानावर पडेल.

आसामात एक कथा लोकप्रिय आहे. भरपूर भात शेती, तळ्यात मासोळीचे उत्पादन यामुळे अन्नाची गरज विनासायास पुरी होते. त्यामुळे असमिया माणूस तामुल (सुपारी) चघळायला व आराम करायला मोकळाच असतो. त्याच्या डोळ्यांत खुषी, चेहऱ्यावर समाधान आणि वागणुकीत आपुलकी जाणवते. पण मुबलकतेमुळे आळस इतका की विचारायला नको. या लाहेलाहे (हळूहळू) वरून आसामात एक गोष्ट प्रचलित आहे. एका झोपडीत दोन मित्र झोपलेले होते. घर सगळे गवताचे! गावाला आग लागली. हे दोघे ढाराढूर झोपलेलेच. यांच्या झोपडीत आग शिरली व पाठीच्या मागच्या बाजूने झळ लागली. तेव्हा एक मित्र दुसऱ्याला म्हणाला, "पिठी-पुरीसे!" म्हणजे पाठ पोळते आहे. पण आळसामुळे तो म्हणाला, "पि.पु." मित्रही आळशी. त्यानेही झोपेतच संक्षिप्त उत्तर दिले. तो म्हणाला, "हि.घु." (हिफाले घुरिबु) म्हणजे इकडच्या कुशीवर वळून झोपा! बोलायचाही आळस!

मेघालयातील गारो पर्वतीय क्षेत्रातील एका गावात तर एका आईने आपल्या तीनही मुलाचे नाव एकच ठेवले आहे. समजा त्याचे नाव जोबांग असेल तर तेच नाव वेगवेगळ्या सुरावलीने ती उच्चारते व मुलंही योग्य प्रतिसाद देतात. आरोह-अवरोहाने उच्चारण बदलते आणि त्यातच अर्थ दडलेला आहे. 'खोंगतांग' हे पूर्व खासी जिल्ह्यातील गाव आहे. अत्यंत दुर्गम स्थान, येथील लोक शीळेने (Whistle) आवाज काढून एकमेकांशी संवाद साधतात. स्थानिक लोकांची नावेदेखील शीळेवरून आहेत. त्यामुळे येथील आमदार लॉमेकर यांनी, Whistling village (शिटीवाले गाव) म्हणून खोमतांग गावास घोषित करावे, अशी मागणी युनेस्कोचे प्रतिनिधी व भारत सरकारच्या सांस्कृतिक मंत्रालयाकडे केली आहे.

केंद्र सरकारच्या 'योजना' मासिकातील वृत्तानुसार; भारतातील ४२ भाषा लुप्तप्राय अवस्थेकडे वाटचाल करीत आहेत. त्यात ईशान्येतील १२ भाषा समाविष्ट आहेत. त्यात मणिपुरातील (आईमोल, आका, कोइरात, लामगांग, लांगरोंग, पुरुम व

तारो) तर अरुणाचलातील (म्रा व ना). आसामातील (ताईनोराव ताईरांग), मेघालयातील ग्गा या सर्व बोलीभाषा आहेत. स्थानिक मोठ्या भाषा जसे असमिया, बंगाली भाषेचा संपर्क वाढणे, व्यापार, शिक्षणासाठी, बाह्यजगाशी संपर्कासाठी प्रमुख भाषेचा उपयोग करणे, तसेच प्राथमिक शाळा, घरांमध्ये बोलणे कमी होणे, हेही कारण आहे. आसामातील 'राभा' जनजातीची, उपजाती 'पाती' ही बोलीभाषा लुप्त झाली तर बाकी उपजातींनी बोलीभाषेच्या संरक्षणासाठी उपक्रम राबविल्याने त्या टिकल्या. आसामातील समतल भागातील सर्वांत मोठी जनजाती असणाऱ्या 'मिशिंग' लोकांनी भाषा चळवळ उभारली. मिशिंग साहित्य सभेनेदेखील यात महत्त्वपूर्ण भूमिका वठवली. ईशान्येत सर्वच क्षेत्रात युवा संघटना सक्रिय असल्याने, त्यांच्या अखिल मिशिंग विद्यार्थी संघटनेनेदेखील प्रयत्न करून, १९८७ मध्ये, तिसऱ्या व चौथ्या वर्गाच्या अभ्यासक्रमात या भाषेचा समावेश केला.

जर एखादी भाषा बोलणारी लोकसंख्या दहा हजार ते एक लाख असेल, तर कालांतराने ती भाषा लुप्त होण्याची संभावना असते. अरुणाचलातील 'कुगिंग' जिल्हा अप्पर सिंयागमध्ये 'तनगमा' बोली भाषा बोलणारे केवळ २५७ लोक आहेत. नॅशनल जिओग्राफीचे ॲंडरसन व रांची विद्यापीठाचे मुरमू यांनी अरुणाचलात 'कोरो' ही बोलीभाषा बोलणारे ८०० लोकांचे गाव शोधून काढले. अरुणाचल प्रदेशातील आका व मिजी जनजाती समान भौगोलिक प्रदेशांत आहेत. पण त्यांची बोलीभाषा वेगळीच आहे. त्यामळे ॲंडरसन यांच्या मते, या अभ्यासामुळे, इतिहास, पौराणिक कथा, व्याकरण असा सर्वच नवीन खजिना सापडला.

४४ आसाम रायफल या सैन्यतुकडीने मणिपूरमधील तामेनलांग गावात गावकऱ्यांबरोबर 'आंतरराष्ट्रीय मातृभाषा दिन' साजरा करण्याचा उपक्रम सुरू केला. यात जवानांनी आपापल्या भाषेतील गीते सादर करणे, गावकऱ्यांनी स्थानिक भाषेतील सांस्कृतिक कार्यक्रम सादर करणे घडत असते. एकदा अशा कार्यक्रमात बोलताना, सैन्याधिकारी प्रदीप कुमार म्हणाले, 'विविध भाषांचा हा उत्सव खऱ्या आणि एकात्म समाज निर्मितीचे पाऊल होय.' अशा उपक्रमांमुळे भाषिक देवाणघेवाण तर वाढलीच पण सर्वसामान्य लोक आणि सैन्यदल यांच्यात आपुलकीचे नाते निर्माण होण्यासही मदत झाली.

विदर्भात मोठ्या संख्येने असलेल्या गोंडी समाजाची भाषा झपाट्याने लुप्त होत आहे. शहरात राहणाऱ्यांची तर बिकट अवस्था आहे. बिरसा मुंडा मंचाच्या सुमन मसरामसारख्या आजी आजही आपल्या वस्तीतील (काछीपुरा, नागपूर शहर)

लहान मुलांना गोंडी बोलायला शिकवत आहेत. मुलं आपली मातृभाषा बोलायला लागल्यावर त्यांच्या आईवडिलांच्या चेहऱ्यावर विलक्षण आनंद प्रकट होताना दिसतो.

एक भाषा समाप्त होणे म्हणजे संस्कृतीच नष्ट होणे आहे. आपल्या देवी-देवता, लोकनृत्य, लोककथा, त्यातून प्रकट होणारी जीवनमूल्ये, भावविश्व समाप्त होत असते. आई, धर्म, इतिहास अशा शब्दांऐवजी मदर, रिलीजन वा हिस्ट्री हे शब्द तेच अर्थ देणारे नाहीत. आपल्या भाषेतील शब्द आदिम स्मृती जागृत करतात. एका विशिष्ट भावबोधात बदलतात. त्यांची जागा घेणाऱ्या दुसऱ्या भाषेत केवळ यांत्रिक माहिती पोहोचते. त्यामुळे अर्थ कळला तरी माणूस भावनिकदृष्ट्या त्या भाषेशी जोडला जाऊ शकत नाही.

भारत सरकारची विविध भाषा संस्थाने या बोलींची, भाषांची नोंदणी करत आहेत. त्यांच्या जतनाचे प्रयत्न करत आहेत. परंतु हे प्रयत्न परिपूर्ण होण्यासाठी सरकारसोबतच स्वयंसेवी संस्था, शिक्षणसंस्था, समाज, मंदिरे अशा सर्वांनाच भाषांच्या संरक्षण आणि संवर्धन यांसाठी पुढे यावे लागेल.

सातव्या शतकात थोनंबी सोमबाटा नामक विद्वानाने नालंदा विद्यापीठातून शिक्षण घेतल्यावर देवनागरी व ब्राह्मी लिपीच्या अभ्यासातून 'भोटी' नामक लिपी तयार केली. अरुणाचलच्या हिमालय क्षेत्रात व तिबेटमध्ये असणाऱ्या तवांग व वेस्ट कामेंग जिल्ह्यातील बौद्धपंथीय मोनपा, शेर्डूकपेन इत्यादी जनजातींच्या बोलीभाषेला यामुळे लिपी मिळाली. या लिपीमुळे हजारो वर्षे बौद्ध तत्त्वज्ञानाचे भांडार जतन झाले, यावर अधिक संशोधनाची गरज आहे. त्याने प्राचीन भारताचे ज्ञानभांडार सर्वांसाठी उपलब्ध होईल. मी चीनला गेलो असताना गुंझावमधील बुद्धमंदिरातल्या टेबलावर भरपूर पुस्तके ठेवली होती व लिहिले होते 'Free, not for sale' वाटेल तेवढी पुस्तके घेऊन जा! ती पुस्तके बौद्ध तत्त्वज्ञानाची होती. विशेष म्हणजे मॅण्ड्रीन, इंग्रजी व संस्कृतमध्ये प्रत्येक पुस्तक तीन भाग करून छापले होते. संस्कृतमध्ये असण्याचे कारण म्हणजे चीनला हे सर्व मूळ ज्ञान बौद्धभिक्षुंच्या मार्फत संस्कृतभाषे-द्वारे मिळाले. जर्मनीतील हॅनोहर येथे औद्योगिक प्रदर्शनास भेट देताना तेथील दालनातील प्रत्येक पत्रक, पुस्तक जर्मन भाषेत होते. तेथील जर्मन व्यक्तीस हे पत्रक इंग्रजी भाषेत असते तर बरे झाले असते, असे म्हटले तर तो उद्गारला, "आपण जर्मन का शिकत नाही?"

मातृभाषा टिकविण्यास स्वाभिमान असणे आवश्यक आहे. अरुणाचलातील प्रबुद्धजनांनी आपली भाषा, परंपरा, संस्कृती जिवंत ठेवण्यासाठी जागतिकीकरण,

पाश्चिमात्यीकरण यांना दोष न देता गुरुकुल पद्धतीवर आधारित 'निबू नवगम येरको' (ज्ञान उपासना केंद्र) हे आधुनिक गुरुकुल 'सेप्पा' येथे सुरू केले आहे. तेथील 'निशी'भाषेत गणित, विज्ञान, धर्म, संस्कृती ह्या विषयांचे अध्ययन होते आहे.

एक भाषा सृजन व्हायला शेकडो वर्षे लागतात. मानवनिर्मितभाषा सामूहिक -सांस्कृतिक संपत्तीचा हिस्सा आहेत. म्हणून आपण या भाषा लुप्त होऊ द्यायच्या नाहीत, असे ठरवायला हवे. ही आपली सामूहिक जबाबदारी आहे! ⬢

**अस्माकं बदरीचक्रं युष्माकं बदरीतरुः। बादरायणसंबंधे यूयं यूयं वयं वयम्।।**

एक माणूस एकदा बैलगाडीने परगावी चालला असताना रात्र झाली. कुठे तरी वस्ती करण्यासाठी तो जागा शोधू लागला, परंतु त्याला सोयीची अशी जागा सापडेना. त्याला एका श्रीमंताच्या वाड्यापाशी एक बोरीचे झाड दिसले, त्याला आपले बैल बांधून तो तेथेच झोपी गेला. थोड्या वेळाने वाड्याचा मालक आला आणि त्याने कोण, कुठला, इथे कशाला आलास वगैरे चौकशी केली. तेव्हा तो म्हणाला, "तुमचा नि माझा संबंध आहेच की!" "तो कसा काय?" असे विचारताच तो म्हणाला, "माझी ही गाडीची चाकं बोरीच्या लाकडाचीच आहेत आणि तुमच्या दारातले हे झाडही बोराचं आहे, म्हणजे तुमचं आणि माझं नातं जुळतंय!"*प्रत्यक्षात काहीही कसलेही नाते नसताना ओढून ताणून जवळीक साधण्या-साठी, नसती नाती जोडण्याचा यत्न केला जातो, तेव्हा **'बादरायण संबंध'** म्हणतात.

महर्षी व्यासांना 'बादरायण' अशीही एक संज्ञा आहे. तीही ओढून ताणून संबंध लावला गेल्याने प्राप्त झालेली आहे. व्यास म्हणजे पराशराला सत्यवतीपासून कौमार्यावस्थेत झालेला पुत्र. त्यांनी नियोगविधीने विचित्रवीर्याच्या दोघी भार्यांपासून धृतराष्ट्र व पंडू व अंबिका दासीपासून विदुर हे पुत्र उत्पन्न केले. याप्रमाणे १०० कौरव,५ पांडव आणि विदुर ह्यांच्या वंशातील कोणाही व्यक्तीचा व्यासाशी संबंध लावला जाऊ शकतो. असा हा ओढूनताणून लावलेला काल्पनिक संबंध! व्यासांनी वेदाचे काही भाग व महाभारत लिहिले. ह्या ग्रंथात जगातील सर्व विषयांचे ज्ञान सामावले आहे. जिचा उल्लेख व्यासकृत ग्रंथात नाही, अशी एकही ज्ञानशाखा नाही म्हणून 'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम्' म्हणतात. जगातील मानव कोणत्याही ज्ञानाचा संबंध व्यासकृत ग्रंथाशी लावू शकतो. विशेषतः मोठ्या व्यक्तीशी दूरच्या नात्याचा संबंध जोडणे. स्वतःच्या क्षुद्र ज्ञानाचा व कार्याचा संबंध दुसऱ्या थोर व्यक्तीशी वा कार्याशी जोडणे, म्हणजे **बादरायण संबंध!**

**(प्रेषक - विजय पाध्ये)**

*(संदर्भ - लाक्षणिक मराठी शब्दकोश, संपा० र० ल० उपासनी)*





अनुक्रमणिका

## भारतीय आदिवासी भाषा: सद्यस्थिती व आव्हाने

**श्रीकृष्ण काकडे**

भारत हा लोकशाही देश आहे, त्यात प्रदेशनिहाय विविधता आहे. येथे अनेक धर्म, जाती, पंथाचे लोक राहतात. प्रत्येक प्रदेशाची वेगळी भाषा आणि संस्कृती आहे. बहुभाषिकता ही भारताची प्राचीन काळापासूनची विशेष ओळख आहे. भारत हा जगात दुसऱ्या क्रमांकाचे भाषिक वैविध्य असलेला देश आहे. भारतात एकूण ७८० भाषा बोलल्या जातात. त्यापैकी सर्वांत जास्त म्हणजे ९० भाषा अरुणाचल प्रदेशामध्ये बोलल्या जातात. महाराष्ट्रात ३९ भाषा बोलल्या जातात. लोकशाहीत प्रत्येक नागरिकासमवेत प्रत्येक भाषेचा सन्मानही महत्त्वाचा आहे. हजारो वर्षांपासून, आदान-प्रदान, शब्दांची देवाणघेवाण आपल्या भाषांनी सामावून घेतली आहे. एक राष्ट्रभाषा ही प्रशासन, विधी, कायदे, दळणवळण यांच्यात सुसूत्रता आणण्यासाठी ठीक आहे, पण त्यातून इतर भाषांवर अन्याय होता कामा नये, हेही तेवढेच महत्त्वाचे आहे.

**आदिवासी भाषांची सद्यस्थिती :** भारतात आदिवासींच्या भाषांबाबत नकारात्मकता दिसून आली आहे. प्रत्येक काळात या भाषांची गळचेपी झाली आहे. आदिवासींच्या मूळभाषा व त्यांचा आत्मसन्मान हरविलेला आहे. भारतीय राज्यघटनेच्या आठव्या परिशिष्टात २२ भाषांचा समावेश आहे. त्यापैकी आदिवासींच्या बोडो व संथाली या दोन भाषा त्यात आहेत. २०११च्या जनगणनेमध्ये नॉन शेड्युल्ड लँग्वेजेस मध्ये भिल्ली, गोंडी, कोरकू, कोलामी, आदिवासी, हळबी जवळपास पंधरा भाषांची नोंद घेण्यात आलेली आहे. एकविसाव्या शतकात माहिती-तंत्रज्ञानाच्या युगात आदिवासी भाषांसमोर अनेक आव्हाने निर्माण झालेली आहेत. अनेक आदिवासी भाषांचे स्वरूप झपाट्याने बदलत असून त्याचे भयावह परिणाम सर्वदूर होताना दिसून येत आहेत. दिवसेंदिवस या भाषांचे स्वरूप तीव्रतेने बदलत आहे. युनेस्कोने घोषित केलेल्या लुप्तप्राय भाषांच्या यादीत भारतातील १९७ भाषांचा समावेश आहे, यातील बहुतांश भाषा आदिवासींच्या आहेत. ज्यात मध्य भारतातील निहाली, नायकी व कोरकू या भाषांचा समावेश आहे. छत्तीसगडमधील बस्तरच्या कांकेर, नारायणपूर, दंतेवाडा, सरगूजा, जगदलपूर या परिसरातील गोंड, धुर्वे, डोरले, मारिया यांच्या भाषांमध्ये परिवर्तन होत असून, काही भाषा लुप्त होण्याच्या मार्गावर आहेत. झारखंडमधील आदिवासी भाषांपैकी हो, मुंडा परिवारातील भाषा अधिक तीव्र गतीने बदलत आहेत. राजस्थानातील भिल्ली व तिच्या अनेक उपभाषा लुप्त होण्याच्या मार्गावर आहेत,





अनुक्रमणिका

ज्यांची संख्या सहाच्या आसपास आहे. उत्तराखंडमधील उत्तरकाशी क्षेत्रातील बंगाणी भाषा, देहरादूनची जौनसारी भाषा लुप्त होण्याच्या मार्गावर आहे. अंदमान, निकोबार पूर्वोत्तर राज्यांमधील अनेक भाषा लुप्त झालेल्या आहेत. अनेक भाषांचे स्वरूप तीव्र गतीने बदलत आहे. ज्यात नागा, कोनयाक यांसारख्या भाषांचा समावेश आहे. कमी-अधिक प्रमाणात हा प्रभाव सर्व आदिवासी भाषांवर पडत आहे. त्यामुळे एखाद्या भाषेचे लुप्त होणे, आपल्या संस्कृतीसाठी अत्यंत घातक आहे. एखादी भाषा जेव्हा लुप्त होते, तेव्हा ही पूर्ण संस्कृती लुप्त होत असते.

अनेकदा व्यवसायाचा प्रांत बदलला की भाषाही बदलते आणि माणसं आपल्या मूळ भाषेपासून दूर जातात. आदिवासी लोकांच्या मूळ परंपरागत व्यवसायात बदल घडून येत आहेत. अनेक लोक आपला पारंपरिक व्यवसाय सोडून नव्या नोकरी-धंद्यास लागले आहेत. त्यामुळे आपल्या मूळ व्यवसायातील अनेक शब्द वापरणे त्यांनी सोडून दिले आहे. पारंपरिक व्यवसाय नसल्यामुळे त्यांत वापरल्या जाणाऱ्या सांकेतिक भाषादेखील विसरत चालल्या आहेत. परिणामी जुन्या पद्धती, त्याच्यातील शब्दवैभव, संज्ञा, संदेश, गुप्तसंकेत नव्या पिढीच्या कानावर पडत नाहीत. त्यामुळे नवीन पिढी या सगळ्या भाषिक व्यवहारापासून अनभिज्ञ आहे. अनेक आदिवासींचा व्यवसाय पूर्वी जंगलभ्रमंती व शिकार होता. जंगल, डोंगरदऱ्यां-मध्ये फिरून ते शिकार करत. त्यावर त्यांचा उदरनिर्वाह चाले. पण इंग्रजी सत्ता भारतात प्रस्थापित झाल्यावर वन-विभागाची स्थापना झाली. त्यामुळे आदिवासींच्या जंगल संचारावर आपोआपच मर्यादा आल्या. स्वातंत्र्योत्तर काळात विकासाच्या नावाखाली अनेक योजना आदिवासींच्या परिसरामध्ये राबवल्या जाऊ लागल्या. पाणी, जंगल, भूमी यांच्यावर अनेक उद्योगांनी आक्रमण केले. खनिज प्रकल्प, व्याघ्र प्रकल्प, वन्यजीव संरक्षण यांच्या नावाखाली अनेक आदिवासींचे जंगलाबाहेर विस्थापन होऊ लागले. त्यामुळे आदिवासी आपल्या प्राकृतिक जीवनापासून दूर जाऊ लागले. प्रकृती, ग्रह-तारे, ऋतुमान, औषधी विज्ञान, पारंपरिक जीवनमूल्ये अशा क्षेत्रांतील आदिवासींच्या ज्ञानाला मर्यादा येऊ लागल्या. याचा सर्वाधिक परिणाम आदिवासींच्या भाषांवर झाला. हजारो वर्षांपासूनच्या निसर्गविषयक संज्ञाचा वापर होत नसल्यामुळे नव्या पिढीपासून त्या तुटत गेल्या. शिकारीवर सार्वत्रिक बंदी आल्याने त्याचा परिणाम भाषेवर झाला. उदाहरणार्थ, शिकार करण्याच्या वेळा, सावधानतेचा इशारा, हाश-हश आवाज, हत्या, दबा धरून बसण्याच्या पद्धती, गनिमीकावा, शिकार भाजण्याची पद्धत, सांगाडा काढायची पद्धत, तुकडे करायची

पद्धत, शिकारीच्या अवयवाची नावे, खाण्याच्या पद्धती असे भाषांमधील अनेक संकेत आज गायब झाले आहेत.

रोजगाराच्या संधी आदिवासी भाषांमध्ये उपलब्ध होत नसल्याने या भाषांना सन्मान प्राप्त झालेला नाही. त्यामुळे रोजगाराच्या शोधार्थ अनेक आदिवासी लोक आपले मूळ क्षेत्र सोडून शहराकडे पलायन करीत आहेत. जागतिकीकरणाच्या काळात इंग्रजी ही माहिती तंत्रज्ञानाची भाषा असल्यामुळे तिचे आकर्षण जास्त वाढले. अनेक लोकांनी इंग्रजी भाषेमधून शिक्षण घेणे सुरू केले. हा इंग्रजीचा वापरही आदिवासी भाषांसाठी मारक ठरला. जे आदिवासी नोकरी, व्यवसायाच्या निमित्ताने गाव-खेडी सोडून शहरात स्थायिक झाले. त्यांच्या कुटुंबातून तर या भाषा लुप्त झालेल्या आहेत. नव्या पिढीला आपल्या मूळ भाषा कळेनाशा झाल्या, ही परिस्थिती आदिवासी भाषांसाठी खूपच मारक ठरली. स्वातंत्र्योत्तर काळात केंद्र व राज्य सरकारांच्या वतीने आदिवासींच्या शिक्षणासाठी अनेक योजना राबविल्या गेल्या. गाव, खेड्यांपर्यंत शिक्षणाच्या सुविधा उपलब्ध झाल्या. तेथे इंग्रजी, मराठी, हिंदी यांसारख्या प्रादेशिक भाषांतून शिक्षण दिले जाऊ लागले. त्यामुळे लहान मुलांची कुचंबणा होऊ लागली. घरात मातृभाषा, शाळेत वेगळीच भाषा, त्यामुळे लहान मुलांचे शाळेत लक्ष लागेनासे झाले. त्यामुळे आदिवासी मुलांनी शाळा सोडून दिल्या. आजसुद्धा सोडत आहेत. वसतिगृहे, आश्रमशाळा, शिष्यवृत्ती यांचा प्रचार व प्रसार झाल्यामुळे आदिवासी मुले शिक्षण घेऊ लागली. परंतु त्या शिक्षणाचा उपयोग रोजगारांच्या संधींसाठी झाला नाही. त्यामुळे आदिवासी मुलांमधील बेरोजगारीचे प्रमाण वाढले. एकीकडे ते आपल्या परंपरेपासून, शेतीमातीपासून तुटले. त्यांना शेतीची आणि अन्य कामे कमीपणाची व अधिक कष्टाची वाटू लागली. दुसरीकडे तकलादू शिक्षणामुळे नोकरी मिळाली नाही, अशा विचित्र परिस्थितीमध्ये आदिवासी मुलांची एक पिढी अडकून पडली.

'डिजिटल इंडिया'मध्ये आदिवासी भाषांचे स्थान शून्य आहे. भारतात अलीकडच्या काळात ही प्रक्रिया इतक्या वेगाने वाढली, की आदिवासी भाषांचा त्यासमोर टिकाव लागला नाही. आदिवासी भाषांचे संरक्षण व संवर्धन याकरिता कोणत्याही प्रकारचे प्रयत्न झाले नाहीत. एक केंद्रीय जनजाती विद्यापीठ व भारतीय भाषा संस्थान, म्हैसूरचे काही प्रकल्प वगळता आदिवासी भाषांच्या विकासाकरिता फारसे प्रयत्न होताना दिसून येत नाहीत. शालेय शिक्षणामध्ये काही तुरळक प्रमाणात पुस्तके वगळली तर या भाषांमध्ये फारशी पाठ्यपुस्तक निर्मिती झालेली नाही.

माहिती-तंत्रज्ञानाच्या युगात अग्रेसर असणाऱ्या इंटरनेट, ब्लॉग, रेडिओ, चित्रपट या क्षेत्रात आदिवासी भाषांना स्थान नाही. मध्यप्रदेशात कोरकू तर छत्तीसगडमध्ये गोंडी भाषेतून रेडिओचे प्रसारण होत आहे. त्यांचे ॲपदेखील विकसित करण्यात आलेले आहे. परंतु दुर्गम भागातील विजेची कमतरता व मोबाईलची रेंज नसल्यामुळे ॲप चालत नाहीत व रेडिओचे प्रसारण देखील त्यांच्यापर्यंत पोहोचत नाही. प्रसारमाध्यमांमध्ये वर्तमानपत्रे, मासिके आदिवासी भाषांमधून प्रकाशित होत नाहीत. त्यामुळे या भाषांचे खरे स्वरूप वाचकांपर्यंत पोहोचलेले नाही. सोशल मीडियावरील फेसबुक, व्हाट्सॲप, ट्विटर अशा समाजमाध्यमांमध्ये आदिवासी भाषांचे स्थान अगदी नगण्य आहे. आदिवासी भाषांना लिपी नसल्यामुळे या भाषांचे डिजिटलायझेशन झालेले नाही, त्यामुळे अनुवादाच्या क्षेत्रातही आदिवासी भाषांचे स्थान नगण्य स्वरूपाचे आहे.

**आदिवासी भाषांच्या संवर्धनाचे उपाय :** आदिवासी भाषा ज्ञानभाषा झाल्या पाहिजेत तरच या भाषांना प्रतिष्ठा मिळेल, समाजात त्यांना मानसन्मान मिळेल आणि त्या टिकून राहतील. आदिवासी समाजातील मूळ साहित्यिकांनी आपल्या मातृभाषेतून लिहून आपली संस्कृती जगासमोर आणणे काळाची गरज आहे. तरच आपल्याला या सर्व भाषांचे स्वरूप जपता येईल. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे संस्कृतप्रमाणे या भाषा लुप्त न होता, त्यांच्यातील प्रवाहीपण कायम राहिलं पाहिजे.

एकविसाव्या शतकातील जागतिकीकरणाच्या काळात आदिवासी भाषां-समोरील आव्हाने मोठी आहेत. त्या अनुरूप या भाषांमधून लोकांना रोजगाराच्या संधी मिळाल्या पाहिजेत. शिक्षण, विज्ञान-तंत्रज्ञान, संज्ञा, संकल्पना या सगळ्या भाषांमधून आल्या पाहिजेत. आदिवासी भाषा संगणकाशी एकरूप झाल्या पाहिजेत. नव्या तंत्रज्ञानानुरूप आज्ञावली तयार करून या क्षेत्रात येणारे युनिकोड, टंकलेखन, कन्व्हर्टर, नवे ॲप यासारख्या अनेक गोष्टींवर आपल्याला लक्ष केंद्रित करावे लागेल. त्याच्यासाठी या भाषांचा चपखलपणे वापर करून घेणे महत्त्वाचे आहे.

भाषा ही मुखातून बोलली जाते व ते संकेत हवेत विरून जातात. पण तिचे जर संरक्षण करायचे असेल तर भाषेला लिपीची आवश्यकता असते. बहुतांश आदिवासी भाषांना लिपी नाही. काही भाषांमध्ये लिपी तयार करण्याचे प्रयत्न झाले आहेत, परंतु ते तुटपुंजे आहेत. त्याला सर्वमान्यता मिळालेली नाही. त्यामुळे आदिवासींच्या लिपीसंदर्भात एक ठोस पाऊल उचलणे महत्त्वाचे आहे. जेणेकरून या भाषांचे स्वरूप जगासमोर येईल व या भाषा टिकून राहतील.

माणसाची भाषिक अस्मिता ही फार महत्त्वाची असते. त्यातून अनेक चळवळी उभ्या राहतात व अनेक वेळा न्याय मिळतो. आदिवासी समाजामध्ये भाषिक अस्मितेविषयी फारशी जागृकता दिसून येत नाही. याला आदिवासी समाजाची उदासीनता देखील तेवढीच कारणीभूत आहे. हे मात्र खरे की गरिबी, दारिद्र्य, कुपोषण, मागासलेपणा, निरक्षरता अशा विविध समस्यांनी त्रस्त असणाऱ्या आदिवासींना आपल्या भाषिक अस्मितेकडे लक्ष द्यायला वेळ नाही, त्यामुळे त्यांच्यामध्ये भाषेविषयीचे आत्मभान व जनजागृती आढळून येत नाही.

या भाषांमध्ये जे पारंपरिक ज्ञान आहे, ते संकलित करणे गरजेचे आहे. कारण पारंपरिक पद्धतीचे ज्ञान अवगत असणारी आदिवासींची शेवटची पिढी शिल्लक आहे. भाषांचे संरक्षण, संवर्धन आणि विकास करणे, हे कुणा एकट्याचे काम नसून त्यासाठी सामूहिक प्रयत्न गरजेचे आहेत. यासाठी मूळभाषक लोकांबरोबरच गैर-आदिवासी लोक, केंद्र व राज्य सरकारे, विद्यापीठे, स्वयंसेवी संस्था यांनी पुढाकार घेणे, काळाची गरज बनली आहे. या भाषांकडे दुर्लक्ष न करता त्यांच्या सर्वांगीण विकासाची योजना राबविणे महत्त्वाचे आहे. म्हणजेच आदिवासी भाषांना लोकाश्रय व राजाश्रय लाभेल, तरच ह्या भाषा टिकतील.

जगात आफ्रिकेनंतर सर्वात जास्त आदिवासी भारतभूमीत राहतात. येथील प्रत्येक आदिवासी समुहाची संस्कृती व भाषा वेगळी आहे. भारतात प्रामुख्याने इंडो-युरोपियन, द्राविडियन, आस्ट्रो- एशियाटिक, तिबेटो-बर्मीज या भाषाकुळांतर्गत, आदिवासी भाषांचे वर्गीकरण केले जाते. इंडो-युरोपियन भाषाकुळात भिल्ली आणि तिच्या उपभाषा, हळबी, पारधी या आदिवासी भाषांचा समावेश होतो. दक्षिण भारतातील द्राविडियन भाषाकुळात गोंडी, कोलामी, माडिया, बैगा यासारख्या भाषा आहेत. ऑस्ट्रो-एशियाटीक भाषाकुळात कोरकू, मुंडा, हो या भाषांचा समावेश होतो तर तिबेटो-बर्मीज भाषाकुळामध्ये नॉर्थ-ईस्टच्या नागा, कोनयाक या आदिवासी भाषा समाविष्ट होतात. निहाली हे स्वतंत्र भाषाकुळ असणारी भाषा महाराष्ट्रात बोलली जाते. या भाषांना स्वतंत्र लिपी नसून त्या मुख्यतः मौखिक आहेत. आदिवासी भाषांची संरचना आणि शब्दभांडारही स्वतंत्र आहे. अनेक लोकगीते, लोककथा, वाकप्रचार व म्हणी यासारखे समृद्ध लोकसाहित्य या भाषांमध्ये आढळून येते. त्यामुळे भाषिक, सांस्कृतिक विविधता टिकवण्यासाठी सर्वांनी प्रयत्न करणे काळाची गरज बनली आहे.

# वडार बोलीभाषा

विजयालक्ष्मी विजय देवगोजी

मानव हा समाजशील प्राणी असून निसर्ग, पर्यावरण, अन्न, वस्त्र, निवारा, औषधे या मूलभूत गरजांसोबतच त्याची बोली भाषा ही अतिशय जवळची आणि महत्त्वपूर्ण असते. वडार समाज हा भटका व विमुक्त समाज आहे. अस्पृश्यांना कमीतकमी गांवकुसाबाहेर तरी राहायला जागा मिळते पण वडारांना तिही मिळत नाही. कामधंद्यानिमित्त भटकंती करताना त्यांनी आपली संस्कृती व बोलीभाषेचेही वहन करुन मौखिक स्वरूपात पिढ्यानपिढ्या तिचे जतन केळे आहे. या समाजाचे सगळ्यात मोठे बलस्थान म्हणजे त्यांची बोलीभाषा होय. कारण ज्या समुहाला आपली स्वतंत्र बोली असते, त्या समुहाचे किंवा जातीचे वेगळेपण टिकून असते.

आंध्र, तेलंगणा येथून स्थलांतरित झालेल्या या जमातीची वडार बोली तेलगू भाषेतून तयार झाली आहे. ज्याप्रमाणे हिंदी भाषेत; अवधी, ब्रज, भोजपुरी, बुंदेली इ. बोलीभाषा आहेत, मराठीत कोंकणी, खानदेशी, वऱ्हाडी, संगमेश्वरी, चंदगडी इ. बोलीभाषा आहेत, त्याचप्रमाणें वडारीदेखील तेलगू भाषेची एक बोलीभाषा आहे, असेही म्हणता येईल. वडार लोक स्वतःला नागवंशी द्रविड समजतात, त्यामुळे या समुहाची भाषा द्रविड भाषा-समुहात सामील होते. ज्या प्रदेशात ही जमात विसावते, त्या प्रदेशाच्या भाषेतील थोडाफार अंश या वडार बोलीत मिसळतो तरीही नव्वद टक्के प्रभाव तेलगू भाषेचाच आहे. तेलगू हा शब्द 'त्रिलिंगा' या शब्दाचा अपभ्रंश मानला जातो आणि तेलगू भाषेवर आधीपासूनच संस्कृतचा प्रभाव होता परंतु 'पांतलुळू' यांनी या तेलगूळा 'वडुका' भाषा म्हणजे बोलीभाषेचे रुप दि ले व तिचा तळागाळातील लोकांपर्यंत प्रसार झाला. तीच तेलगू भाषा इ.स.पूर्व ५०० ते १००० या काळात अस्तित्वात होती, याचे पुरावे इ.स. सहाव्या शतकातील शिलालेखात आढळतात. अशा या अभिजात भाषेतून निर्माण झालेली बोलीभाषा म्हणजे वडारबोली होय. मात्र ही शुद्ध तेलगू नाही तर ती तेलगूमिश्रित आहे. स्थलांतरामुळे बऱ्याच शब्दांत बदल घडलेला दिसतो, त्याचप्रमाणे या भाषेत कानडी शब्दांचा वापरही मोठ्या प्रमाणात दिसून येतो. सद्यपरिस्थितीत तर असंख्य इंग्रजी शब्दाचा वापरही होताना आढळतो.

या बोलीला स्वतंत्र लिपी नाही. पण मौखिक स्वरूपात आजही ती जिवंत आहे. व्यामिश्र पध्दतीची बोली असून तीत अनेक वैविध्यपूर्ण शब्द आढळतात आणि हे शब्द उच्चार करण्यास कठीण असतात. पण वडार व्यक्ती मात्र अगदी सहजतेने हे

शब्द उच्चारतात. या भाषेत मवाळपणा नाही पण ही भाषा भाषाशास्त्राच्या दृष्टीने महत्त्वाची आहे कारण या भाषेत दीर्घ शब्दांचा वापर मोठ्या प्रमाणात आढळतो, त्याचप्रमाणे 'ड' हा शब्द बरेचदा येतो.

जॉर्ज ग्रीयर्सन यानी केलेल्या भारतीय भाषेच्या चिकित्सक लिखाणात वडार बोलीभाषेचे थोडेफार उल्लेख आढळतात तर 'गावगाड्याबाहेर' या प्रभाकर मांडेंच्या पुस्तकात या भाषेचा थोडा उल्लेख दिसून येतो. डॉ.बी.एन.भालेराव यांनी मात्र त्यांच्या 'बोळीया, समाज और संस्कृती' या पुस्तकात वडार बोलीभाषेला थोडाफार न्याय द्यायचा प्रयत्न केळा आहे.

हे लोक ज्या प्रदेशात राहतात त्या प्रदेशातील भाषेचे हेल व ध्वनी उच्चारणाचा प्रभाव त्यांच्या भाषेवर होतो. महाराष्ट्रात मराठी, कर्नाटकात कन्नड, तामिळनाडूत तमीळ भाषेचा प्रभाव त्यांच्या भाषेवर दिसतो. इतकेच नाही तर इतर बोलीभाषा आणि सीमावर्ती भागातील भाषेचाही प्रभाव आढळून येतो आणि बोली - तील शब्दातही वेगळेपण जाणवते. प्रादेशिकतेचे रंगगंधही या भाषेला लाभले आहेत. महाराष्ट्रात नांदेड, भोकर, देगळूर, किनवट येथीळ वडारी बोलीत तेलगु भाषेचा, लातूर, उस्मानाबाद, सोलापूर, सांगळी भागात कन्नड भाषेचा, कोल्हापूर, सातारा, पुणे, मुंबई भागात मराठी भाषेचा पडलेला प्रभाव जाणवतो. त्यामुळेच औरंगाबाद जिल्ह्यात बाळंतिणीच्या स्नानगृहाला 'बच्छाळ' आणि पायाला 'काळू' म्हणतात तर यवतमाळ जिल्ह्यात अनुक्रमे 'कोल्तीगुंता' व 'काल' असे म्हणतात, गाडीवडार, माती वडार, पाथरवट इ. पोटजातींमध्ये बोळताना काही शब्दाच्या उच्चारामध्ये ऱ्हस्व-दीर्घच फरक जाणवतो. या तीनही जातीतील शब्द वेगवेगळ्या ढंगाने वापरले जातात. ही बोलीभाषा कामचलाऊ, व्यवहारात तसेच सांकेतिक भाषा म्हणूनही वापरली जाताना दिसते.

इंग्रजी भाषेप्रमाणे या भाषेतही आदरार्थी सर्वनाम नाही. फक्त 'मीर' हा शब्द अनेकवचनी सर्वनाम तुम्ही किंवा आपण या आदरार्थी सर्वनामाप्रमाणे येतो. 'नू' हा शब्द तू किंवा तुम्हीसाठी वापरला जातो.

**सर्वनामे- मराठी (वडारी)**

| | |
|---|---|
| मी, आम्ही (नानू/नान्, मीमू/माम्) | तू, तुम्ही (नू, मीरू/मीर) |
| तो, ती (आ, आदी/ई) | ते (वारू/वार) |

**वाक्यरचना - मराठी (वडारी)**

तुम्ही / आपण या. (मीर दांडा) ; तुम्ही / आपण बसा. (मीर कुसनांड)
तू ये. (नू दा) (एकवचनी); तुम्ही या. (मीर दा) (आदरार्थी/एकवचनी)
तू बैस (नू कुसनू) (एकवचनी)

**क्रियापदे :** बरीचशी क्रियापदे ईकारान्त 'दी' ने जोडलेली आढळतात. उदाहरणार्थ उठणे (लेशाडदी), कापणे (कोशाडदी), खाणे, जेवणे (तिन्नेडदी), जाणे (पोय्यडदी), चावणे (कोरक्यादी), बसा (कुसून), ऊठ (लेयी), हसणे (नग्गेद)

**भारतीय भाषांतून आलेले शब्द :** वडारी भाषेत दिसून येणारे काही शब्द हिंदी, मराठी, कानडी, इंग्रजी भाषांचा प्रभाव दाखवितात. वानगीदाखल काही--

| **हिंदी** | **मराठी** | **कन्नड** | **वडारी** |
|---|---|---|---|
| - पगडी | पटका | पटका | पटका |
| - रूमाल | रूमाल | रूमाल | रूमाल |
| - करेला। | कारले | कारळी | कारल्याळ |
| - कलई | मनगट | मनगटे | मनगटमू |
| - मसूडा | हिरड्या | हिरड्या | हिरड्याल |
| - मूछ | मिशा | मिशी | मिसाळू |
| - ऊंट | ऊंट | वंटी | वंट्या |

बरोबरीनेच इंग्रजी भाषेतील बस, कार, रेल्वे, रोड, इंजेक्शन, स्टेशन, कप, ग्लास, डॉक्टर, सायकल इ. शब्दांचा दैनंदिन भाषेत त्याच अर्थाने वापर होतो.

**वडार भाषेतील काळ**

**१) भूतकाळ : (भूतकालमू)**

-- मी आलो (नेनु वच्चानु) ; आम्ही आलो (मीमु वच्चामु)
-- तो आला (अतनु वच्चीनाडू) ; ती आली (अम्मे वच्चनादी)
-- तुम्ही आलात (मीरू वच्चीनारू)

**२) वर्तमानकाळ (वर्तमानकालमू)**

--- मी येते, येतो (नेनु वस्तानु); आम्ही येतो (मेमु वस्तामु)
--- तू येतोस (नीवु वस्तावु); तुम्ही येता (मीरू वस्तारु)
--- तो येतो (अतनु वस्ताडु) ; ती येते (आदि वस्तांदी)
--- त्या, ते येतात (वारु वस्तारु)

**३) भविष्यकाळ (भविष्य कालामु)**

--- मी येईन (नेनु वस्तानु) ; आम्ही येऊ (मिमु वस्तामु)

--- तू येशील (नुवू वस्तावु) ; तुम्ही येणार (मिरु वस्तारु)
--- तो, ते येतील (वारु, अतनु वस्तारु) ; ती येईल (आदी वस्तादी)

**वाक्प्रचार**

- मड्यावर टाकणे (बोंदा मिंदा येय)
- घराला आग लावणे (इछुग आगी तालगी)
- थांब तुझे पाहून घेतो (थांबा निद सुस्तान)
- तुझ्याच्याने होतं ते कर (नितोंठा आते शकसको)
- पाहून घेतो (सुसकोटात)
- घोड्यावर बसून आला (गुर्राम एक्की वच्छीनाडू )
- दगड फोडायला जा (राय मोतदेनकी फो)
- नदी पाण्याने भरुन वाहते (वंका निंदा नेळ फारताय)

**म्हणी**

- काखेत कळसा गावाला वळसा (चंकन बिड्डा पट्टीकोनी ऊरता वेतीकारु)
- गोगळ गाय पोटात त पाय (चुड्डानिकी नेकी चचंचेलिक क गोडलू ळू तोव्वनी पंदिकोक) काक)
- नाव सोनुबाई हाती कथलाचा वाळा (पेरु गोप्प ऊरु दिब्ब)
- मांजराला उंदीर साक्ष (पिल्लीकी एलका साक्ष)
- नाव मोठे लक्षण खोटे (कस्तुरीवारु इल्लु गब्बीलाल कंपु)
- स्वभावाला औषध नाही (स्वाभानिकी मंदु लेदू)
- तोंड चांगलं तर गाव चांगलं (नोरु मचिदूउंटे ऊरु मचिंगा)
- बघून ये म्हटलं तर जाळून येतो (चुची रमंटे कालची वस्ताडू )
- खायला काळ आणि भुईला भार (तिंडीक तिमराज पानिक पोतराज)
- आई जेवू घालीना, बाप भीक मागु देईना (अम्मा पेट्टा पेटदू आडु को तिनवदु)
- कुत्र्याचे शेपूट वाकडे (कुका ताका वळगा)
- बुध्दि असुन गवत खाते (बुध्दि गडडी तिनड)
- तोंड काळं कर, निघून जा. (मुती नलगा सेयू)
- पाण्याचा पैसा पाण्यात गेला (नेळा फालु नेळाला फो)
- मुंगी होऊन साखर खावी, पण हत्ती होऊन लाकूड फोडू नये (सिमा आयी शकार मेआल येनग्या अयी कट्टल कोरकादारल)
- महापुरे लव्हाळे वाचती (वंकाल निंडी फारते गरका नेतीएतका निलश्लीनाद)

- उकराल तेवढा कचरा (तिप्पानिंडा कसुर)
- राजाला दिवाळी काय माहीत? (राजानक फंडगा येम गोत्त)
- ताकाला जावून मडके लपविणे (कुराक फोयी कुंडा दासकिन्या)
- उंटावर बसून शेळ्या हाकणे (ओंट्यामिंदा टुशीन म्याकाळ कासेद )
- पालथ्या घड्यावर पाणी (नेत्ती मिंदा नेळ)
- पाण्यावर लोणी काढणे (नेळामिदा यन्ना तिशेद)

**वडार बोलीभाषेतील दैनंदिन व्यावहारिक शब्द**

**१ अवयव** : उजवा हात (तिन्यासेई/खुडीसेई) ; डावा हात (येडमा सेई / रोड्डासेई)
- उजवा पाय (खुडीकाल) ; डावा पाय (यडमा काल); पाठ (बेळू)
- खांदा (गुजाम), त्वचा (तोल); हाड (यमका); छाती (यदा); चेहरा (मुती)

**२) वस्त्र**
- सदरा (अंगी) ; चड्डी (श्ल्यगाम) ; धोतर (ओल्या) ; लुगडी (शिरा)
- झंपर (फोलका) ; परकर (लगा) ; वाकळ (बंताल) ; घोंगडी (ग्वांगाडी)

**३) वस्तू**
- सुई दोरा (सुदी धाराम्) ; पोतं (तित्ती) ; दाभण (दभणान्) ; सूप ((स्याटा)
- आरसा (कनीडग्या) ; पेटी (संदकाम) ; झाडू (फरका) ; विळी (ईळग्या)
- पंख (फवोच्छ) ; तंबाखू (फगाक) ; माती (मन्न) ; चिखल (बुर'धा)
- गाळ (एदूल), पाणी (नेळ), देव (ध्यावर)

**४) आठवड्याचे वार** : 'मु' हा प्रत्यय लावून बोलले जातात.
- रविवारमु, सोमवारमु, मंगळवारमु, बुधवारमु,
- गुरुवारमु (बृहस्पतीवारमु), शुक्रवारमु (लक्ष्मीवारमु), शनिवारमु

**५) वेळ**
- दिवस (दिननु), दिवसा (पगलु), पहाट (ववेकुवझामु)
- सकाळी (तेललवारी), दुपार (नध्यहन्मु),
- सायंकाळी (सायंकखल्मु), रात्र (रात्री), तास (गंटा)

**६) ऋतु**
- उन्हाळा (एंडाकालम, वेसकीकालमु), पावसाळा (वर्षाकालमु)
- हिवाळा (शीताकालमु,चळीकालमु)

**७) पशू**





अनुक्रमणिका

- बैल (एद्दू), गाय (आवु), रेडा (दुन्नपोतु), म्हैस (गंदे), पोडा (गुर्रमु),
- गाढव (गाडिद), कुत्रा (कुक्का), मांजर (पिल्ली), बकरी (मका), मेंढी (गोरे)

**८) पक्षी**

- पोपट (चिलका), कबुतर (व्याळवा), मोर (नेमिली), कोंबडा (कोडी), साप (पामु)
- बदक (बातु), माकड (कोती), उंदीर (एलुका), , कोल्हा (नक्क), लांडगा (तोंडली)

**९) भाजीपाला (कुरगायलु)**

- वांगे (वंकायलु), कांदे (उल्लीपायलु), टमाटे (पुलवुकायलु),
- भेंडी (बेंडकायलु), भोपळा (सोरकायलु), दोडके (बीरकायलु), कैरी (मामीडकायलु)

**१०) नातेवाईक** - आई (अम्मा), आजी (अम्मम), वडील (नान्ना), आजोबा (ताता), मावशी (पिन्नतळी), काका (पेदनाना), आत्या (अत), काकू (पिन्नमा), सासु (अतगारु), बहीण (चेलछ्लेळू)

**११) जेवण**

- चपाती (गोदमा रोट्या), भाकर (जीना रोट्या), वरण भात (ब्रियाम पापू),
- पुरणपोळी (पोल्या), आंबट वरण (पुलाड पापू), लोणचे (उरगा)
- दही (पेरगु), ताक (साला), दूध (पाल), तूप (नई)

**शिव्या :** वडारबोलीत श्लील-अश्लीलतेचा विचार न करणाऱ्या शिव्या बिनदिक्कतपणे वापरल्या जातात. अपेक्षित परिणामासाठी त्यांचा वापर केला जातो. बोलताना त्या बीभत्सपणे बोलल्या जातात.

- काळतोंड्या (नाल्ला मुट्टोडा), रांड (गवशी), भडवीच्या (गवश्या)
- ढेरी फोडतो (ढेरगा पाडेस्तान), तुळा गाडतो (नीनू कुडतान)
- तुला जाळतो (नीनु कालतान), केस उपटतो (येंडकाळ पिकताना)

**गुप्त सांकेतिक भाषा :** वडार समाज भटका असल्याने इतर भटक्या समाजाप्रमाणे त्यांची एक गुप्त व सांकेतिक भाषा आहे. त्या भाषेला 'पारुषी','पारशी' अथवा 'पारोशी' भाषा असे म्हटले जाते. त्याचप्रमाणे नेत्रपल्लवी', 'करपल्लवी' असेही उल्लेख आढळतात. ज्यावेळी हाताला कामधंदा नसतो, उपासमारीची वेळ येते, समाजाने लाथाडलेले असते त्यावेळी नाईलाजास्तव गुन्हेगारीकडे वळल्यामुळे पोलीसांपासून संरक्षण मिळविणे, कायद्याच्या कचाट्यातून सुटका करुन घेणे, इतर समाजघटकांपासून संरक्षण मिळविणे, गुन्हेगारी कौशल्य टिकवणे, इ. कारणासाठी

ही गुप्त व सांकेतिक भाषा तयार केली गेली असावी. उपजीविकेच्या आणि सुरक्षिततेच्या दृष्टीने ही पारुषी भाषा या भटक्या समाजाला विपरित परिस्थितीत जगविणारी, संरक्षण देणारी म्हणून अद्यापही वापरात आहे, असे दिसते. मात्र नवीन पिढी पारुषी भाषेला अनभिज्ञ आहे. कर्नाटक वडार पारुषी भाषेतील काही शब्द याप्रमाणे -- घरफोडी, डाका (पेरडू, उन्सळू), घरफोडीचे हत्यार (शिलाकट्टी), चोरी (दोंगा),

- चोरीचा माल (दोंगापाणी, वल्कमू), घर, वाडा (पेरडू), धाड (कोत्तलू),
- मारहाण (उनसळू), पोलीस वरिष्ठ अधिकारी (परमेश्वर), पोलीस (मुल्लावाडू).
- टोळी प्रमुख, नायक (पेद्दाड, पोळीस पाटील, सरपंच (नेमटू) - भिंतीतील भोक, भगदाड (मणकलू)

नवीन शिक्षित वडार तरुणांना स्वतःची बोली बोलण्याची लाज वाटते. दुर्दैवाने या भाषेला स्वतःची लिपी नाही. परिणामी लिखित स्वरूपात साहित्य आढळून येत नाही. ज्या काही आख्यायिका, दंतकथा, लोककथा, लोकगीते ऐकायला मिळतात त्या सर्व मौखिक स्वरूपात. ज्या भाषेला लिपी नसते त्या भाषेचा विकास होत नाही आणि या अर्थाने वडारी बोलीभाषा विकसित नसल्याने वडार समाजाचा विकास अत्यंत धिम्या गतीने होताना आढळून येतो. सध्या तरी हा समाज ज्या प्रदेशात वास्तव्य करून आहे त्या प्रादेशिक भाषेलाच त्यांनी आपल्या शिक्षणाचे माध्यम बनवून आपल्या विकासाचा मार्ग पत्करला आहे.

भटक्या लोकांच्या बोलीभाषा लोप पावू नयेत म्हणून काही व्यक्तींची धडपड सुरू आहे. नांदेड जिल्ह्यातील कमळेवाडी येथील 'विद्यानिकेतन' शाळेतून हे प्रयोग होत आहेत. शिवाजी आंबुलगेकर या प्रयोगशील शिक्षकाने 'अनुवादाची आनंदशाळा' हा उपक्रम राबवून आश्रमशाळेत शिक्षण घेणाऱ्या प्रत्येक भटक्या जमातीतील विद्यार्थ्यांसाठी त्यांच्या बोलीभाषेतून मराठीतील कवितांचा अनुवाद केला जातो आहे. संत नामदेवांचा "पतितपावन नाम ऐकुनी" हा अभंग गंगाधर इरगलवार या मुलाने वडारी बोलीभाषेत पुढील प्रमाणे केला.

पतितपावन पेर इनी आस्ती नेनू तलपुला,
पतितपावन लेवू आनी पोती एनकाकू.
नामा अन्टाडू देवूडा नीदी एम्बी तळगदी नाकू ,
प्रेम उन्डानी मनसुला आनी पडता कालामिदा.

जागतिकीकरण, औद्योगिक क्रांती, शिक्षणामुळे आलेले आत्मभान, बदलता




अनुक्रमणिका

समाज प्रवाह इत्यादी कारणांमुळे वडार बोलीभाषा हळूहळू लुप्त होण्याचा मार्गावर आहे. वडारी भाषेचा शब्दकोश वगैरे उपक्रम राबविणे गरजेचे आहे. तरच येणारी पिढी या भाषेचा अभ्यास करु शकेल व अमूल्य असा बोलीभाषेचा ठेवा या समाजाला जतन करून ठेवता येईल.

**संदर्भ :**


१) वडार समाज: इतिहास आणि संस्कृती, भीमराव व्यंकप्पा चव्हाण, प्र. आ. २००७.

२) महाराष्ट्र टाईम्स २४/२/२०१३.

३) वडार समाज: स्थिती आणि गती, श्रीकांत मुद्दे, प्र. आ. २०१४.

४) वडार संस्कृती आणि साहित्य, डॉ. सीमा चवरे, प्र. आ. २०१४.

५) वडार समाज : परंपरा व इतिहास, टी.एस्.चव्हाण, प्र. आ. २०१६.

६) युगशिल्पी (मागोवा वडार जमातीचा), प्रा. शिवमूर्ती भांडेकर, दु. आ. २०१९.

७) दिव्य मराठी - विरा राठोड


## मराठीच्या विविध बोलींचे सर्वेक्षण

जॉर्ज ग्रिअर्सन ह्याने भारतातील सर्व भाषांचे सर्वेक्षण करून जवळपास एक शतक उलटले आहे. डेक्कन कॉलेज, पुणे आणि राज्य मराठी विकास संस्था, ह्या महाराष्ट्र शासनाच्या संस्थेने मिळून महाराष्ट्रातील बोलींचे सर्वेक्षण हा प्रकल्प २०१७ पासून हाती घेतला आहे. ह्या प्रकल्पातील काही जिल्ह्यांतील सर्वेक्षण पूर्ण झाल्यानंतर आता सदर प्रकल्पाचे संकेतस्थळ तयार झाले आहे. अद्याप सर्वेक्षण आणि त्यातून मिळालेल्या माहितीचा अभ्यास सुरू असल्याने सदर संकेतस्थळ परिपूर्ण झालेले नाही. मात्र आधुनिक काळात भाषेचे असे सर्वेक्षण हाती घेणारे एकमेव राज्य म्हणजे महाराष्ट्र राज्य आहे. आपण सर्वांनी आवर्जून Survey of Dialects of Marathi Language **www.sdml.ac.in** ह्या संकेतस्थळाला भेट द्यावी आणि मराठीच्या विविध प्रादेशिक रूपांचा परिचय करून घ्यावा.






अनुक्रमणिका

पुस्तक परीक्षण

## 'खालाटी वलाटी' -लोकजीवनाचे सांस्कृतिक नाते जपणारी मालवणी कादंबरी

बाळकृष्ण रामचंद्र लळीत

'विस्कळित होऊ पाहणाऱ्या कोणत्याही मानवी समुहाला एकत्रित ठेवण्यासाठी भाषेचा बंध निःसंशय उपयोगी पडतो, म्हणूनच समाज एकजीव ठेवण्याच्या प्रयत्नात भाषेने भाषेने बजावलेल्या कामगिरीचा वेळोवेळी गौरवपूर्ण उल्लेख करावा लागतो. त्यातही सर्वसामान्यांची बोलीभाषा व त्यातील साहित्यनिर्मिती हा एक स्वतंत्र विषय आहे. एकाच प्रदेशातील निरनिराळ्या विभागातील सर्व लोकांना समजू शकेल अशा भाषेत लिहिणे लेखकांचे कर्तव्यच ठरते, कारण त्यांच्या प्रादेशिक अस्मितेचे दर्शन घडवण्याचे कार्य ते करत असतात. म्हणूनच 'बोलीभाषेतील लेखन हा अभिमानाचा विषय व्हायला हवा, तेव्हाच बोलीतून लेखन करणाऱ्या कवी, लेखक, साहित्यिक यांना खऱ्या अर्थाने प्रतिष्ठा मिळेल आणि ते दिवस आता फार दूर नाहीत,' असे मला वाटते.

देवगडजवळच्या 'हिंदळे' गावी राहून गेली २०-२५ वर्षे आपल्या लेखनात मालवणी बोलीभाषेचा सहज आविष्कार करणारे प्रा. अविनाश बापट हे एक उत्तम लेखक आहेत. सातत्याने लेखनमग्न आणि आपल्या अनुभवांशी प्रामाणिक राहून लेखन करणारी मालवणी मुलखातील जी मोजकी लेखक मंडळी आहेत, त्यापैकी ते एक आहेत. मुंबई विद्यापीठानेही त्यांच्या मालवणी कवितांचा अभ्यासक्रमात समावेश करून एक प्रकारे गौरवच केला आहे!'

मालवणी बोलीतील पहिली कादंबरी म्हणजे कुडाळच्या दयानंद नाईक यांची डिसेंबर २००५मध्ये प्रकाशित झालेली 'कायापालट' (सोनाली प्रकाशन, कणकवली) होय. त्यानंतर जवळजवळ १५ वर्षांनंतर संपूर्णपणे मालवणीतून कादंबरी प्रकाशित न होणे हे निदान मालवणीसारखी प्रगत बोली बोलणाऱ्या लोकसमुहाला तरी भूषणावह नाही. पण एवढ्या काळानंतर का होईना हजारो-लाखो लोक अहोरात्र जी बोली बोलतात, त्या मालवणीतून अस्सल समाज दर्शन घडवणारी ही कादंबरी कोल्हापूरच्या 'रावा प्रकाशन'तर्फे प्रकाशित होत आहे, ही एक ऐतिहासिक नोंद आहे.

आजवर मालवणी बोली असलेल्या कादंबऱ्या लिहिल्या गेल्या नाहीत का? तर नक्कीच लिहिल्या गेल्या आणि त्या प्रकाशितही झाल्या; मात्र संपूर्णपणे मालवणी

बोलीतील ही दुसरीच कादंबरी असावी. शिवाय खऱ्या अर्थाने ललितलेखनातून लोक-जीवन व लोकसंस्कृतीचे अचूक दर्शन घडविणारी समर्थ कलाकृती आहे.

मालवणी मुलुखातील 'खालाटी' म्हणजे समुद्राजवळचा भाग नि 'वलाटी' म्हणजे सह्याद्रीच्या पायथ्याशी असलेला भूभाग. हा सारा प्रदेश सिंधुदुर्ग जिल्ह्यातील असला तरी सांस्कृतिक दृष्टीने भाषा, समाजजीवन, रीती-परंपरा एकच आहे, असे वाटणेही साहाजिक आहे; पण ही कादंबरी वाचल्यावर आपले हे मत बदलते!

**लोकसांस्कृतिक संदर्भ** : मनाची पकड घेणारे कथानक, एकाच वेळी समुद्र-किनाऱ्यावरील वादळ-वारा नि समिंदराशी नाळ जुळलेले लोकजीवन आणि दुसऱ्या बाजुला 'वलाटी' म्हणजे सह्याद्रीच्या पायथ्यालगतचे कोकणी लोकांचे लालमातीच्या सुखदुःखात माखलेले म्हणजे शेतीवर अवलंबून असलेले खडतर जीवन हा कादंबरीचा गाभा आहे. त्यामुळे मालवणी लोकजीवनाची ओळख ही कादंबरी वाचताना होतेच होते, पण वातावरणनिर्मिती, प्रादेशिक भाषेतली संवादशैली, अस्सल व्यक्तिरेखाटन, घटना-प्रसंग यांची रेलचेल यामुळे वाचक एका अनोख्या अनुभवविश्वाशी स्वतःला लगेचच जोडून घेतो.

मालवण-देवबागची राधा मुंबैकर गिरणवाल्या चाकरमानी निखिलशी लग्न करून वलाटीतील फोंड्याजवळच्या घोणसरी गावी येते. लहानपणापासून पुळण, होडक्या आणि मासेमारी हे जीवन अनुभवलेली राधा आता पाटाचे पाणी असताना सासूच्या सांगण्यानुसार विहीरीचे पाणी काढून फुलझाडे शिंपत आहे. जुई, सोनचाफा, अबोली तिला आपली वाटतात. बैलगाडीतून प्रवास करते आहे. घरात वीज नाही, साधा रेडिओही नाही असा हा काळ आहे. पतीबरोबर धरणावर फिरायला गेल्यावर शेतघरात (मांगरात) निखिलचा मिळालेला अद्भुत, रोमांचकारी नि स्वतःला विसरायला लावणारा सहवास, दाजींबरोबर केलेली देवशेती, निखिलचे होळीच्या दिवसात 'गोमू' कोळीण बनणे, दाजींनी खास तिच्यासाठी आणलेले मासे, डुकराची शिकार आणि त्याच्या मटणाची चव, वटपौर्णिमेचा 'मांड'- उखाणी, चांदण्या रात्री निखिल, दाजी नि मैत्रीण शेवंतासोबत केलेली सफर, एकेकाळी मालवणच्या बाजारात पाटी भरून मासे विकणारी राधे, आता फोंड्याच्या बाजारात अबोलीचे वळेसार, सोनचाफ्याची फुले, चिकू, पेरू चढ्या भावात विकू लागली आहे. सासूचा बदललेला स्वभाव, वेगळेच वागणे, निखिलचे मुंबईत असणे या विचित्र परिस्थितीत समजून घेणाऱ्या प्रेमळ दाजींचा होणारा मृत्यू

कसाबसा पचवून जगू शिंदे व शेवंताच्या मदतीमुळेच तिचे आला दिवस पुढे ढकलणे सुरूच आहे. त्यातच धरणफुटीमुळे घरसंसाराचे वाजलेले तीन तेरा आणि त्यानंतरचे राधाचे जगणे, तिचा संघर्ष समजून घेण्यासाठी ही कादंबरी सर्वांनी वाचायलाच हवी.

**ऐंशीच्या दशकातले समकालीन जीवन** : या कथानकाचा कालखंड १९८०च्या दशका-तील आहे. मासेमारीवर जगणं, शेतीची खडतर वाट या गोष्टीत मालवणी माणूस संघर्ष करत होता, तो हा काळ आहे. ह्या काळाचे लेखन करताना, सूक्ष्म  निरीक्षण व केलेला सविस्तर अभ्यास लेखकापाशी आहे, हे वाचकाला जाणवत राहते. राधेचे भावजीवन नि वास्तव जगणे समजून घेताना वाचक प्रादेशिक जीवन समजून घेण्यात कधी रमतो हे समजतच नाही आणि  त्यामुळे कथानकाच्या शेवटच्या टप्प्यात मिळणारे धक्के कधी-कधी कृत्रिम वाटत असले तरी एक अपरिहार्यता म्हणून तो तेही समजून घेतो. 'असे खरेच घडते का?' तर 'हो असे घडू शकते,' यावर विश्वास ठेवून ही कादंबरी वाचक संपवतो. यातून घडणारे लोकसांस्कृतिक मूल्यशिक्षण वाचकाला समृद्ध करेल असा मला विश्वास आहे.

लेखकाची  मालवणी शब्दांची जाण, समज पक्की आहे. 'खालाटी व वलाटी' मधील सामान्य लोकजीवनाचा त्यांनी केलेला अभ्यास, घेतलेले कष्ट पानोपानी ध्यानी येतात. शिवाय लेखक स्वतः वनस्पतिशास्त्राचे जाणकार प्राध्यापक आहेत, त्यामुळे जगू शिंदे ही व्यक्तिरेखा व त्याच्या अनोख्या नोकरी व्यवसायाची ओळख होते. (असे काही उत्पन्नाचे साधन असते, हेच दुर्दैवाने सागरकिनारी राहणाऱ्या तरुणाला माहिती नाही. म्हणूनच जगूचे कोल्हापुरी असणे, ही लेखकाच्या अभ्यासू वृत्तीचे प्रतिबिंब ठरते.

दक्षिण कोकणातील देवदेवस्की, वारेसूत्र, गाऱ्हाणे, रीतीभाती, परंपरा, समुद्रकिनारी असणारे सामान्य माणसांचे सरळ-साधे जगणे याचे बारीकसारीक तपशील लेखनात वारंवार येतात. डॉक्टर नावाचा मासा, त्याचे मोठ्या माशांच्या तोंडात जाऊन दात साफ करणे, कल्ल्यातील कीडे काढणे, हजारो मैल स्थलांतर करणारे मासे, माशांचे आकार व त्यावरची माहिती वाचताना आपण जणू प्रा. बापट सरांच्या तासालाच बसलोय की काय, असा भास होतो. लेखकाला 'काव्यम व्यवहारविदे' (साहित्यातून व्यवहारज्ञान) हे प्रयोजन आणता येते, हे येथे लक्षात येते.

**कादंबरीतील लोकसाहित्यविषयक संदर्भ** : मौखिक परंपरेने घातली जाणारी गाऱ्हाणी, लोकगीते, उखाणी, लोककथा, लोकश्रद्धा आणि अंधश्रद्धाही येथे शब्दबद्ध

झालेल्या आहेत. मालवणी प्रदेशातील आहारपद्धतीप्रमाणेच होडीसाठी कोणते झाड उपयुक्त असते इथपासून भरती-ओहोटी, मासेमारी नि रापण निर्मिती, लिलाव यांचे जनप्रबोधन हा लेखक सहजपणे करतो. कादंबरीत लळितांच्या हॉटेलचा आलेला छोटासा संदर्भही स्थान बदलले, तरी ऐतिहासिक आहे. देवगड परिसरात अशी एकही व्यक्ती नसेल की, तिने तेथील लळित कुटुंबाने गेली शंभर वर्षे दिलेली 'काळ्या वटाण्याची उसळ नि कांदा भजी' खाल्ली नसेल! हे वाचताना त्याच आडनावाचा धागा म्हणून माझाही ऊर किंचित दाटून आला. कारण पुण्याच्या 'मालवणी गजाली' या हॉटेलचे मालक कै. प्रमोद प्रभू मला काही वर्षांपूर्वी म्हणाले होते, 'त्या लळितांच्या चवीमुळे मी या क्षेत्रांत जम बसवला. असे संदर्भ प्रादेशिक जीवन घडवताना फारच महत्त्वाचे असतात.

'तरी मी ह्यांका सांगत होतंय खालाटीची पोरगी आपणाक नुको, लगीन जाल्यार झीलाचो संप जालो. ऐदे दीस जाले मिटात की त्याका घराहारी बसाक लागात....ता म्हायत नाय.. दाजींका तोंडातोंडी जावचा लागला.. पांढऱ्या पायाची सून! आणि नशिबात काय खेळ बघूचे हत ते देवाक ठावूक.' या सासूच्या उद्गारावर आपल्याला दाजींनी कधीच पांढऱ्या पायाची म्हटले नाही, असे ठणकावून सांगणाऱ्या राधेची ही कहाणी आहे. आपण 'खालाटी'ची आहोत; पण 'वलाटी'ची सगळी शेतीभातीची कामे शिकले असे राधा सुनावतेही. वलाटीत सतत पडणारा मुसळधार पाऊस.. रात्रीचा उडालेला हाहा:कार नि पुढे जे भोग राधेच्या वाट्याला येतात ते वाचकांनी तन्मयतेने वाचावे. कारण हे भोग कमी-अधिक प्रमाणात मालवणी मुलखातून जीवन जगणाऱ्या स्त्रियांच्या वाट्याला आलेले आहेतच.

'सासू आणि निखिलच्या प्रेताक मीच अग्नी देणार!' हे निक्षून सांगणारी राधा पुन्हा खालाटीला म्हणजे देवबागला येते.. नवं जीवन सुरू करते पण.....? काहींच्या वाट्याला फक्त त्याग नि भोगच असतो; तो तिच्या जणू पाचवीला पूजला आहे... बकुळा माजा चुकला गो? चुकला बंड्या केरकराच्या प्रेमाक ठोकरलंय....माका मुंबैवालो चाकरमानी व्हयो होतो..... तो माज्या वाट्याक इलो आणि बोल बोल म्हणता दूर निघान गेलो!"

तारुण्याच्या उंबरठ्यावर राधा नि बंड्याचे नवथर प्रेम तुटते. रापणीसाठी जाळे विणताना ते पुन्हा विणले जाते का? मूळात या मातीतच जन्मलेली माणसे सत्त्वशील, पापभिरू, सरळ मनाची आहेत. जीवाला जीव देणारी, कुणाकडून कसलीही अपेक्षा न ठेवणारी संस्कारसंपन्न आहेत. म्हणूनच बऱ्याच काळानंतर एक

निखळ मालवणी ग्रामीण जीवनदर्शन घडवणारी, वाचकांच्या अंतर्यामी असलेल्या लोक-सांस्कृतिक व संस्कारशील बोलीत लिहिलेल्या या साहित्यकृतीचे स्वागत, वाचक-समीक्षक करतीलच करतील याची मला पूर्ण खात्री आहे.

पानोपानी बोलीतील शब्दकळा, आवश्यक तेथे म्हणी, लहान लहान वाक्ये, संवादी शैली, स्त्रीसुलभ भावनांचे केलेले अचूक चित्रण येते. विशेष म्हणजे शिव्यामुळे काहीशा बदनाम झालेल्या बोली..आपल्याकडे आहेत. पण येथे एकही शिवी येत नाही. अपशब्द, अशिष्ट शब्दही नजरेस पडत नाही!

जीवनमूल्ये जपण्याचे नकळत शिक्षण, जगण्याचा मार्ग अडथळ्याचा असला तरी वाट्याला आले ते जगत राहायचे हा लेखन दृष्टिकोन येथे  जाणवतो. अंधश्रद्धा -श्रद्धा यांचे धुसर होत जाणारे बंध लेखक अशा पद्धतीने रेखाटतो की, वास्तव समाजजीवन असेच आहे, असे म्हणणे भाग पडते.

कादंबरीच्या शेवटी वाचकाला धक्के बसतात, पण लेखकाने येथे कलात्मक आव्हान स्वीकारले आहे. जगू शिंदेने आणून दिलेल्या रेडिओवर राधा गाणे लावते...

एक प्यार का नगमा है, मौजोंकी रवानी है,

...................... आना और जाना है। आणि इथेंच ही कहाणी थांबते. बोलीभाषेतून लिहिलेल्या या कादंबरीचा शेवट भारतीय एकात्मतेचे प्रतीक असलेल्या हिन्दी भाषेतील अमरगीताने होतो. वाचक प्रदेशबंधने तोडून राष्ट्रभाषेतील हे गीत गुणगुणत राहतो.

कोकणातील एका लहानशा 'खालाटी'तून आलेली नि 'वलाटी' या भागाला आपलं मानणारी 'राधा'.. एक प्रातिनिधिक मालवणी स्त्री आहे. ती हुंदके देत-देत जगते; पण तसे जगणे वाट्याला आले तरी जिद्दीने पुन्हा उभी रहाते. ती खरी भारतीय नारीशक्ती आहे. वाचताना आपण हे सारे कुठेतरी पाहिले आहे, ऐकले आहे असे वाटते; कारण गावोगावी, आवाठा-आवाठातून राधेसारखे वाट्याला आलेले जगणं मूकपणे सहन करणाऱ्या अनेक राधा आपल्याला माहिती आहेत. म्हणून ही राधेची ही 'खालाटी वलाटीची' वारी कधीतरी संपली पाहिजे. 'राधा.....!' खालाटीच्या घोंगावणाऱ्या वाऱ्या-वादळाप्रमाणे...नि वलाटीच्या धुंवाधार रोरावणाऱ्या पावसाप्रमाणे तनमनात झिरपत राहते. या छोटेखानी कादंबरीतून एका समाजातील सामाजिक, धार्मिक, आर्थिक, नैतिक, लोकसांस्कृतिक, पारंपरिक चौकटींचा शोध घेता येतो, एवढे नक्की!

# तडवी भिल्ल : समाज आणि संस्कृती

डॉ. धनराज तोताराम धनगर

तडवी ही सातपुडा पर्वतरांगांमध्ये तसेच महाराष्ट्राच्या उत्तरेकडील सातमाळा डोंगराळ भागात वस्ती करून राहणारी एक आदिवासी जमात आहे. आदिवासी भिल्ल जमातीशी संबंधित असणारी ही जमात १६८५ ते १७०७ या काळात औरंगजेबाच्या राजवटीत धर्मांतरित झाली. तथापि मुस्लिम धर्म स्वीकारल्यानंतरही हिंदु संस्कृतीतील सण-उत्सव परंपरांचे पालन व हिंदू देवी-देवतांची पूजा या जमातीतील लोक आजही करतात. या तडवी जमातीची स्वतःची अशी एक वेगळी वैशिष्ट्यपूर्ण संस्कृती आहे. तसेच एक स्वतंत्र बोलीभाषादेखील या जमातीचे लोक बोलतात. ही बोलीभाषा 'तडवी बोली' म्हणून ओळखली जाते. या बोलीभाषेच्या अनुषंगाने असणारे या जमातीचे स्वतंत्र साहित्यदेखील आढळते. आपली स्वतंत्र संस्कृती जपण्याच्या हेतूने काही गुप्त संकेत या बोलीत आढळतात. आपल्या बोलीच्या संदर्भाने गुप्तता हे लोक पाळतात. तथापि यामुळे बोली नामशेष होण्याचा जो धोका भाषा अभ्यासक वर्तवतात ही बाब या बोलीलाही लागू होते. आधुनिकीकरणाच्या युगात शिक्षणाचा मोठ्या प्रमाणावर प्रसार या जमातीच्या लोकांमध्ये होताना दिसतो आहे. ही खरे तर त्यांच्या विकासाच्या दृष्टीने चांगलीच बाब म्हटली पाहिजे. परंतु मोठ्या प्रमाणावर शिक्षित होणारी ही पिढी आपल्या बोलीभाषेपासून दूर जाताना दिसते. आधुनिकीकरण, यांत्रिकीकरण आणि जागतिकीकरणाचा प्रभाव या लोकांच्या बोलीवर होताना दिसतो. त्यामुळे या बोलीतील असणारा लोकसाहित्याचा, सांस्कृतिक खजिना जतन करण्याचे मोठे आव्हान उभे राहिले आहे.

**तडवींचा सामाजिक इतिहास :** जगातील मूळ आदिम परंपरांशी नाते सांगणाऱ्या ज्या काही मूळ आदिवासी जमाती आहेत त्यातील भारतातील भिल्ल जमात ही एक आहे. आजही डोंगर, घनदाट जंगलातून ही जमात वस्ती करून राहते. भारतातील आदिम जमातींच्या संदर्भात अजीज तडवी यांनी पुढील अभिप्राय नोंदवलेला दिसतो. ते लिहितात, "पुरा पाषाण काळात आदिवासी भिल्लांचे अस्तित्त्व दिसून येते. इ.स.पू. ३००० ते इ.स. १७५०-१८००पर्यंत आदिवासी संस्कृती भारतात व जगात अस्तित्वात होती. याचे पुरावे मानववंश संशोधकांना मिळालेले आहेत. प्राचीन भारतीय धार्मिक, पौराणिक ग्रंथांतून व दंतकथांमधूनदेखील आदिवासी भिल्लांचे उल्लेख येतात. रामायण-महाभारत काळापासून आदिवासी भिल्ल जमातीचे

अस्तित्व इथे होते हे सहज मान्य होण्यासारखे आहे. यात निषाद, शबर, नाग, किरोत, द्रविड, पुलिंद, अभिर या आदिम जमातींचा उल्लेख आढळून येतो. रामायणात आदिवासी शबरी भिल्लीणीचा उल्लेख येतो. महाभारतात एकलव्याचा उल्लेख येतो. अर्जुनाने आदिवासी कन्या चित्रांगदा हिच्याशी विवाह केल्याचे उल्लेख येतात. भीमाचा पुत्र 'घटोत्कच' आदिवासीपुत्र आहे. पुरा-पाषाण काळात, लोह घुंगरू नसताना, नागदिवाळी सणाला आदिवासी गांडा ठाकूर यांनी कोंबडीची पिल्ले पायाला बांधून नृत्य केल्याची दंतकथा, आख्यायिका भारतीय समाजात प्रचलित आहे."[१] श्री अजीज तडवींनी दिलेले हे सर्वच पुरावे सार्थ आहेत. भारतातील महाराष्ट्र , गुजरात, मध्यप्रदेश व राजस्थान आदी भागांमध्ये भिल्ल ही आदिवासी जमात आढळते. भिल्ल हा शब्द द्रविडी भाषेतील 'बिल्ल' म्हणजे धनुष्य या शब्दावरून आलेला असल्याचे मत अभ्यासक नोंदवतात. धनुष्य हे शस्त्र या जमातीतील लोक वापरत असल्याने 'भिल्ल' हे नाव या जमातीस पडले असावे हे मान्य होण्यासारखे आहे. अत्यंत शूर व कष्टाळू म्हणून ही जमात ओळखली जाते. त्यांच्या शारीरिक ठेवणीवरून भिल्ल हे मूळ अनार्य, द्रविडी वंशांचे असावे मात्र नंतरच्या काळात आर्यांशी संकर होऊन भिल्लांच्या उपजमाती किंवा पोट जमाती निर्माण झाल्या असाव्यात अशीही शक्यता नोंदवता येईल. मराठी विश्वकोशामध्ये गरसिया या भिल्ल जमातीच्या पोट जातीबद्दल नोंदवलेला अभिप्राय या संदर्भात पाहता येईल. "गरासिया : राजस्थानमधील एक आदिवासी जमात. गरासियांची गुजरात राज्यातही थोडी वस्ती आढळते परंतु तिथे त्यांना भिल्ल गरासिया व डुंगरी गरासिया या नावांनी संबोधिण्यात येते. १९६१ च्या खानेसुमारीनुसार त्यांची लोकसंख्या ६२,५०९ होती. ही भिल्लांचीच एक शाखा असून राजपूत व भिल्ल यांच्या मिश्र संकरामधून ती निर्माण झाली असावी. आपण मूळचे राजपूत आहोत, अशी गरासियांची समजूत आहे. पुढे भिल्लांनी आपल्याला काही जमिनी दिल्या आणि त्यांच्यात सामावून घेतले, असे ते म्हणतात."[२] या प्रमाणेच भिल्ल जमातीच्या इतरही पोट जमाती निर्माण झालेल्या असाव्यात.

**भिल्ल जमातीच्या शाखा**- भिल्लांचे प्रामुख्याने दोन उपविभाग आहेत. त्यांना 'हगा' आणि 'हगवाडीया' असे म्हणतात. हगामध्ये भाऊ व वडिलांच्या संबंधातील नातेवाईक येतात. तर हगवाडियामध्ये ज्यांचेशी विवाह करता येईल असे नातलग येतात. एकाच हगामध्ये विवाह होत नाही. हिंदूंच्या गोत्र पद्धतीप्रमाणेच ही पद्धत आहे. भिल्लांमध्ये २७ ते ३६ गोत्र सांगण्यात येतात. कुलचिन्हाच्या आधारावर गोत्रांची विभागणी दिसते. साधारणपणे दोनशेच्या जवळपास भिल्लांमधील कुळे व उपकुळे

आहेत. ही कुळे किंवा आडनावे निसर्गसन्मुख आदिवासी परंपरेतील आहेत. काही कुळांची उदाहरणे या संदर्भात पाहता येतील. जांभळे (जांभळाचे झाड), रोहिणी (नक्षत्र), आवलिया (आवळयाचे झाड), मोरे (मोर), सोलीआ (सूर्य), घोडमाऱ्या (घोडे मारणारे) इत्यादी. याशिवाय खानदेशात भिल्ल जमातीच्या अनेक शाखा आहेत. नंदुरबार, धुळे, जळगाव जिल्ह्यांत; भिल्ल, वळवी, वसावे, पाडवी, नाईक, गावीत, मावची, पावरा, ढाणका, तडवी भिल्ल, बरडेभिल्ल हया प्रमुख शाखा असून त्यात काही प्रादेशिक गटही आहेत. त्यात प्रामुख्याने कोटलेभिल्ल, मथवाडेभिल्ल, मेवाडीभिल्ल, गरासिया भिल्ल, ढोली भिल्ल, नेवासी भिल्ल, रावळ भिल्ल, लाढयाभिल्ल, बोंडे-गवाल, टेड भिल्ल, नायडो भिल्ल इत्यादी प्रादेशिक गट दिसून येतात.

**खान्देशातील आदिवासी तडवी भिल्ल :** तडवी भिल्ल, तडवी मुसलमान हे प्रामुख्याने जळगाव जिल्ह्यात आढळून येतात. सातपुड्याच्या आश्रयाने मध्यप्रदेशातील बुऱ्हाणपुरापर्यंत ही जमात विखुरलेली आहे. मुघल बादशहा औरंगजेबाच्या काळात तडवी हे बाटून मुसलमान झाले, त्यामुळे मूळ भिल्ल आदिवासी जमातीपासून 'तड' पडला व 'तडवी भिल्ल' असे त्यांना म्हटले गेले. 'तड' पडलेली जमात म्हणजे 'तडवी' अशी तडवी या शब्दाची उपपत्ती सांगितली जाते. तडवी बोलीचे अभ्यासक अजीज तडवी मात्र "तत्कालीन मध्य भारतातील भिल्लांच्या प्रमुखास 'तडवी' म्हणत व त्याचे अनुयायी त्याच्या शब्दावर पूर्ण विश्वास ठेऊन त्याची आज्ञा पाळत. 'तरबी' असा अरबी भाषेत शब्द असून त्याचा अर्थ मार्गदर्शक किवा वाटाड्या असा आहे."[३] असा अभिप्राय नोंदवतात. श्री अजीज तडवी यांनी सांगितलेली उपपत्ती खरी मानली तरी धर्मांतरामुळे इस्लाम धर्म स्वीकारलेल्या मूळ भिल्ल आदिवासींच्या नायकांना बक्षीस म्हणून सरदारकी देऊन त्यांना 'तरबी' असे संबोधले असावे. कारण अरबी भाषेशी मूळ आदिवासी भिल्ल समाजाचा संबध येण्याचे दुसरे कारण दिसत नाही. शिवाय धर्मांतरीत झालेल्याविषयी त्यांच्या मूळ आप्त-स्वकीयांत तिरस्काराचीच भावना राहिलेली दिसते. धर्मांतरानंतर मूळचे मुस्लीम असणारे स्वत:ला श्रेष्ठ समजत असल्यामुळे इस्लामशी एकजीवत्व साधणे, या धर्मांतरित समाजाला शक्य झाले नाही. मुस्लीमधर्मीयांनीही दुजाभाव ठेवल्याने त्यांच्यातील 'तड' कायम राहिला. त्यामुळे मूळ आदिवासी भिल्ल समाजापासून पडलेला 'तड' व इस्लामपासूनही राहिलेली 'तड' पडल्याची जाणीव यामुळे 'तडवी' हे नाव या जमातीस पडले असण्याचीच शक्यता अधिक वाटते. मुस्लीम समाजातदेखील 'तडवी मुसलमान' अशीच ओळख या जमातीची निर्माण झालेली दिसते. महाराष्ट्र शब्दकोशात "तडवी-

बाटून मुसलमान झालेले भिल्ल"[४] अशी नोंद आढळते. तर जळगाव जिल्हा गॅझेटीयर मध्ये "तडवी हे भिल्लांचे वंशज आहेत."[५] अशी नोंद आढळते.

आदिवासी भिल्लांनी मुस्लीम धर्म का स्वीकारला? हा एक वादग्रस्त मुद्दा आहे. हयासंदर्भात; मुघल बादशहा औरंगजेबाने केलेली धाक-दपटशाही, जमिनी वतनांचे प्रलोभन किंवा अजीज तडवी यांच्या म्हणण्यानुसार, इस्लामच्या सुफी संतांच्या शिकवणुकीचा प्रभाव अशी विविध कारणे मान्य केली तरी आपल्या मूळ आदिवासी हिंदू प्रथा, परंपरा, सण-उत्सव, रुढी त्यांनी सोडलेल्या नाहीत, हे महत्त्वाचे!

**आदिवासी तडवी भिल्ल जमातीचे धार्मिक जीवन** : वर उल्लेख केल्याप्रमाणे, आदिवासी तडवी जमातीत; हिंदू व मुस्लीम परंपरेतील सण-उत्सव, हिंदू व मुस्लिम देवी-देवतांची पूजा, तसेच आदिवासी परंपरेनुसार निसर्गातील विविध घटकांची पूजादेखील केली जाते. तूर्तास सर्वच आदिवासींप्रमाणे तडवी जमातीतही निसर्गपूजा केली जाते त्यामुळे त्यांना आदिवासीच म्हटले पाहिजे.

आदिवासी तडवी 'महादेव व पार्वती' यांची आजही 'आदीपिता व आदिमाता' म्हणून पूजा करतात. आजही बाळ जन्मल्यानंतर बाराव्या दिवशी बारश्याचा, मुलाच्या नामकरण सोहळ्याचा कार्यक्रम हिंदू प्रथेप्रमाणेच होतो.

"झुला बांधला सटवी माय
सहादेव ल्या
महादेव द्या
झुला बांधला सटवी माय
महादेव ल्या
सहादेव घ्या" असा हिंदू रीतीप्रमाणे नामकरण विधी करतात. पाच सवाष्ण स्त्रियांच्या हातून हा विधी केला जातो. तसेच रात्री बाळाच्या डोक्याखाली पेन-वही ठेवून, सटी (सती, पार्वती) येऊन त्यावर बाळाचे भविष्य लिहिते, आशीर्वाद देते असा समज आहे. याचप्रमाणे तडवींची कुलदैवतेदेखील खंडेराव, खंडोबा, भवानी, बहिरमबुवा, बहिरोबा, भैरवनाथ, आडगाव (तालुका यावल) येथील मनुदेवी, बुऱ्हाणपूरजवळील इच्छादेवी, आशिरगडची आशापुरी माता, वणीची सप्तशृंगीदेवी, घाटनांद्राची जोगेश्वरी माता आदी हिंदू देवी देवतांची पूजा तडवी करतात. तडवींच्या या 'कुलदेवता' आहेत. थोडक्यात आदिवासी तडवी यांच्या धार्मिक जीवनाचा विचार करता निसर्गउपासक असणारे आदिवासी तडवी मूळ आदिवासी भिल्ल जमातीचे




अनुक्रमणिका

असून पूर्वापार सनातन हिंदू संस्कृतीशी संबंध आल्याने हिंदू देवी-देवतांना भजतात. हिंदूंच्या कुलदेवतानाच अजूनही ते कुलदेवता मानतात. सुफी संतांच्या दर्ग्यांना भेट देऊन चादर चढवणे, नमाज पढणे, कुराण ए शरीफ चे वाचन करणे आदी मुस्लिम धर्मसंस्कारांचा स्वीकारही तडवींनी केला आहे. मुस्लिम परंपरेतील ईद, रमजान यांचेही आचरण तडवी करताना दिसतात. तथापि हिंदू आणि मुस्लिम धर्माविषयी सारखीच श्रद्धा असणाऱ्या या तडवी आदिवासींना आपल्या आदिवासी परंपरांचा देखील सार्थ अभिमान असलेला दिसतो.

**आदिवासी तडवी भिल्ल जमातीचे आर्थिक जीवन :** तडवी भिल्ल आदिवासी असल्याने आदिवासींचे असणारे व्यवसाय शिकार करणे, मासेमारी करणे, जंगलातून डिंक गोळा करणे, मध गोळा करणे, वेगवेगळ्या वन-औषधी गोळा करणे व त्या विकणे, त्याचप्रमाणे जंगलातील लाकडे यांचा व्यापार आदिवासी तडवी करतात. काही आदिवासी तडवींकडे परंपरेने इनाम मिळालेल्या जमिनी आहेत. वंशपरंपरेने हिस्से-वाटे होऊन अल्पस्वल्प प्रमाणात कुणाकडे एक एकरापासून ते पंधरा-वीस एकरापर्यंत जमिनी आहेत. काळ्या सुपीक जमिनीचे प्रमाण कमी असून, डोंगर उताराची पडीक चराऊ कुरणे असलेली जमीन काही तडवींकडे आहे. त्यातही सिंचनाची सोय मोजक्याच शेतीत आहे. काहींनी डोंगर उतारावर सागाची शेतीही केली आहे. सागवानी लाकूड विकून अर्थव्यवहार चालतो. अत्यंत मेहनतीची कामे करणारे तडवी तुटपुंज्या मजुरीवर कसातरी संसाराचा गाडा ओढताना दिसतात. ज्यांच्याकडे थोडीफार शेती आहे ते जोडधंदा म्हणून पशुपालनही करतात. शेळीपालन, कुक्कुटपालन आदी व्यवसाय करताना दिसतात. जमिनीची धूप थांबवण्याच्या नावाने गुरे चराईवर बंदी आणल्यामुळे 'बाप जेऊ घालीना आणि आई भीक मागू देईना' अशी अवस्था झाल्याची भावना पशुपालन करणारे तडवी भिल्ल बोलून दाखवतात. स्वातंत्र्योत्तर काळात अनुसूचित जमातीचे (एस.टी.) आरक्षण मिळाल्यामुळे पहिल्या पिढीतील थोड्या फार शिकलेल्या आदिवासी तडवींना सहज नोकऱ्या मिळाल्या. तृतीय श्रेणी, चतुर्थश्रेणी कर्मचारी म्हणून काम करणाऱ्या या पिढीतील कर्मचाऱ्यांची दुसरी पिढी शिकून काहीजण अधिकारी पदावर देखील कार्यरत आहेत. शिक्षक, प्राध्यापक, वकील, क्लर्क, स्टेनो टाइपिस्ट, पोलीस, शिपाई व सैन्यदलात देखील काही सुशिक्षित तरुण नोकरी करतात. तथापि समाजातील शिक्षणाचे प्रमाण दुसऱ्या पिढीपर्यंत तेवढे नव्हते. सद्यस्थितीत शिक्षणाचे महत्त्व आदिवासी तडवींना कळू लागले आहे. शिक्षण घेऊन नोकरी करणाऱ्यांचे प्रमाण

वाढत आहे. आरक्षणामुळे राखीव जागा मिळाल्याने ग्रामपंचायत सदस्य, नगरसेवक व महापौर अशी राजकीय कारकीर्दही काही कर्तबगार तडवींनी गाजवलेली आहे. शेतीमातीत राबणाऱ्या तडवींच्या संसारात स्त्रियांचाही आर्थिक वाटा महत्त्वाचा आहे. स्त्रियांचे शिक्षणाचे प्रमाण कमी असले तरी आता मुला-मुलींच्या शिक्षणाकडेही लोक गांभीर्याने पाहू लागले आहेत. मुलीही शिकून नोकरीला लागल्याची तुरळक उदाहरणे आहेत. मात्र व्यवसायाकडे, उद्योगधंद्याकडे अजूनही आदिवासी तडवी वळलेला दिसत नाही. जेमतेम आर्थिक परिस्थिती असूनही आनंदी आणि समाधानी जीवन जगणारा तडवी समाज प्रगतीकडे वाटचाल करताना दिसतो. स्वकर्तृत्वावर विश्वास ठेवून अडचणींवर मात करण्याची परंपरागत लढावू वृत्ती आदिवासी तडवींमध्ये दिसते. मातीची चुल, स्टीलची व जर्मनची भांडी, पाण्यासाठी मातीचे माठ, रांजण असा अल्पस्वल्प संसार घेऊन; चोपडा, यावल, रावेर, बुऱ्हाणपूर तालुक्यातील सातपुडा पर्वताच्या पायथ्याशी असणाऱ्या गावांमध्ये हा समाज राहतो. विटा-मातीने बांधलेल्या भिंतींवर बांबू गवताने शाकारलेली छप्परे, काहींच्या घरावर पत्रे, काहींची घरे धाब्याची, तर काहींची पक्की सिमेंट कॉंक्रीटचीही आढळतात. वेगवेगळे आर्थिक स्तर असणारी ही माणसे शिक्षणामुळे आपला आर्थिक स्तर उंचावल्याचे सांगतात.

**आदिवासी तडवी भिल्ल यांचे सामाजिक जीवन :** या समाजातील कुळे व आडनावे पहिली असता; ती हिंदू जातीव्यवस्थेप्रमाणेच असणारी आडनावे आहेत. उदाहरणार्थ ठाकूर, गायकवाड, बागुल, जाधव, ठाकरे, पवार, चव्हाण, सोनवणे, सोनुने, गवळी, पालवे, बारी, मोरे, घटे, शिरसाट, आहेर, सोलंकी, गव्हाणकर, जांभळे, जांभूळकर, बोरावके, साळुंके, सोळंके, जमादार, भोलाने, गवई, बर्डे, सुलताने, भारस्कर, भारसाके, सोलंकर अशी आडनावे आढळतात. त्याचप्रमाणे कुलदेवता देखील हिंदू परंपरेप्रमाणेच आढळतात. तडवी समाजाची कुळदैवते खंडोबा किंवा खंडेराय, भवानी, मरीआई, बहीरमबुवा, भैरवनाथ, मनुदेवी, इच्छादेवी, आशापुरी माता, कालिंका देवी, जोगेश्वरी माता, सप्तश्रृंगी देवी याशिवाय मरीआई, मुंजोबा यांची पूजा ते करतात. इस्लाम धर्म स्वीकारल्यामुळे घोडेस्वार पीर बाबा, सज्ञन शहावली, ताजुद्दिन बाबा, मौलाना शहा बाबा, मोईनुद्दीन बाबा, जंगली पीर बाबा व शिर्डीचे साईबाबा यांना भजणारी मंडळी देखील खानदेशातील या तडवी जमातीत आहेत. महादेवास मूळ आराध्य दैवत आणि पार्वतीस आदी भिल्लीण माता मानणारी ही जमात खऱ्या अर्थाने धर्मनिरपेक्ष वृत्तीची व सहिष्णू वर्तनाची आहे.

**तडवी भिल्ल जमातीची 'चोरवनी झोपडी' आणि विवाह पद्धती** आदिवासी भिल्ल

समाजाप्रमाणेच तडवी जमातीत या चोरवनी झोपडीचे विशेष महत्त्व आहे. जंगलात अज्ञात ठिकाणी, कुणाच्याही दृष्टीस पडणार नाही अशा ठिकाणी गावाबाहेर ही झोपडी बांधली जाते. ती आतून पान फुलांनी सजवलेली असते. गावातील तडवी जमातीचा पुढारी किंवा म्होरक्या किंवा म्होरकी हे अविवाहित युवक-युवतींना येथे घेऊन येतात. येथे युवक-युवती मुक्तपणे एकमेकात मिसळतात. एकत्र जेवण, मद्यप्राशन व विविध खेळ आणि नृत्य करतात आणि आपल्याला आवडणाऱ्या जोडीदारासोबत शय्यासोबतही करतात. किंबहुना आपल्याला आवडलेल्या जोडीदाराचे पुरुषत्व व स्त्रीत्व याची ही परीक्षाच असते. या चोरवनी झोपडीला शैय्यागृह, गोटुल, युवागृह असेही म्हटले जाते. या युवक युवतींकडून श्रमाची कामे , संरक्षणाची कामे, शिकार करणे, जंगली श्वापदे - कोल्हे, रानडुकरे यांपासून शेतीचे संरक्षण करणे इत्यादी कामेही करून घेतली जातात. युवक-युवतींनी निवडलेल्या जोडीदारासोबत विवाह करण्यासंदर्भात कुटुंबातील ज्येष्ठ सदस्यांशी संवाद साधला जातो. तडवी समाजामध्ये साखरपुड्याला 'फुटाणे' असे म्हणतात. लग्नाची तिथी ब्राह्मणाकडून काढून मुहूर्त ठरविला जातो. पूर्वी आदिवासी परंपरेने ही लग्ने होत असत. भगत लग्नाची तिथी ठरवत असे व भगतच लग्न लावत असे. या बालविवाह पद्धतीला 'टीका पद्धती' असेही म्हटले जात असे. सध्या ही परंपरा लोप पावली असून मुस्लिम पद्धतीने 'निकाह' लावला जातो. काही ठिकाणी चोरून-लपून अजूनही 'टीका' पद्धतीने विवाह करून नंतर 'निकाह' लावण्यासाठी नवरदेव मांडवात आणतात. निकाहावेळी नवरदेव मांडवात व नवरी घरात असते. मुस्लीम धर्मीयांसोबत रोटी व्यवहार आहेत, तथापि बेटीव्यवहार नाही. निकाह लावत असले तरी 'तलाक पद्धत' या जमातीत नाही. पूर्वी जातपंचायती समोर 'फारकत' होत असे आता कोर्टात फारकतिचे निर्णय होतात.

**आदिवासी तडवी भिल्लांमधील विवाह प्रकार :**

**१) आते-मामे भावंडांमधील विवाह :** यात विशेष करून मुलीला आत्याघरी सून म्हणून दिले जाते. आतेभावाशी विवाह केला जातो, काही वेळेस मामाच्या मुलाशी विवाह होतात.

**२) जिजा-साली विवाह :** विशेषत: मोठ्या बहिणीच्या दिराशी किंवा मोठी बहीण वारल्यास किंवा अपत्य होत नसल्यास प्रत्यक्ष मोठ्या बहिणीच्या नवऱ्याशी, काही वेळेस जिजा-साली संबंधातून सालीस दिवस गेले असतील तर जिजा साली विवाह होतात. पूर्वी बहुपत्नीत्वाची पद्धत असताना असे विवाह अधिक प्रमाणात व्हायचे.

आता एक पत्नीत्वाचा पुरस्कार तडवी समाजात केला जाताना दिसतो. त्यामुळे अपवादात्मक स्थितीतच असे विवाह होतात.

**३) विनिमय विवाह किंवा साटेलोटे पद्धत** : यात ज्या घरी मुलगी सून म्हणून दिली जाते त्याच घरची मुलगी घरात सून म्हणून आणली जाते.

**४) संमती विवाह** : पालकांच्या संमतीने होणारा हा विवाह आहे. वर-वधू यांचीही संमती या विवाहास असते. विवाह मुहूर्त काढून समारंभपूर्वक हा विवाह संपन्न होतो.

**५) सहपलायन विवाह** : या विवाह पद्धतीत वर-वधू यांची मने जूळलेली असतात. प्रेमसंबंधातून एकमेकांच्या संमतीने पळून जाऊन लग्न करतात. आदिवासी भिल्ल पद्धतीप्रमाणेच ही विवाह पद्धती आहे.

**६) अपहरण विवाह** : आदिवासी समाजातील ही एक परंपरा असून वर किंवा वधूच्या घरची मंडळी विवाहास संमती देत नसतील तर वर वधूचे अपहरण करतो. मात्र अपहरणास वधूची संमती असते.

**७) परीक्षण विवाह** : ही देखील आदिवासींमधील एक विवाह पद्धती आहे. वधूकडील मंडळी वराची परीक्षा घेतात. तसेच काही आदिवासींमध्ये स्त्रीच्या कौमार्याची परीक्षा घेतात. यास परीक्षण विवाह असे म्हणतात.

**८) हट्टागमन पद्धती किंवा घरगुसी** : यामध्ये स्त्री हट्टाने तिला आवडलेल्या पुरुषाशी विवाहबाह्य संबंध ठेवते. पहिले लग्न झालेले असतानाही दुसरा विवाह करण्याची ही पद्धती घरघुसी पद्धती म्हणून ओळखली जाते.

**९) टिका विवाह** : पूर्वीच्या काळी मुलगी जन्माला यायच्या आधीच मुलीच्या आईच्या पोटाला टिका लावून मुलगी झाल्यास आमची सून करू असे ठरवले जाई. या पद्धतीला टिका पद्धती असे म्हणतात. यथावकाश मुलं मोठी झाल्यानंतर भगताकडून किंवा ब्राम्हणाकडून मुहूर्त काढून असे विवाह संपन्न होत असत. अजूनही अपवादात्मक स्थितीत असे विवाह होतात.

**आदिवासी तडवी भिल्लांमधील 'दफन विधी किंवा मर्त्य संस्कार'** :आदिवासी भिल्ल व तडवी जमातीत मृत्यूनंतर शव जाळत नाही तर त्याचा 'दफनविधी' होतो. तडवी भिल्ल समाजाची 'दफनविधी'ची स्वतंत्र जागा असते. या दफनभूमीत 'आसाबा' म्हणतात. व्यक्ती मेल्यानंतर चाळीसाव्या दिवशी उत्तरकार्य करतात. त्यास 'चेहलम' म्हणतात. या दिवशी मृत व्यक्तीचे कुटुंबीय नातेवाईक एकत्र येतात. रात्री हज , मोहम्मद पैगंबर साहेब, अल्लाच्या नावाने भजन, स्तुती गायनाचा कार्यक्रम करतात व मृत व्यक्तीच्या मुक्तीसाठी प्रार्थना करतात. दुसऱ्या दिवशी सकाळी गोस मांड्यांची





अनुक्रमणिका

किंवा दाळ-भात-पोळीचे जेवण देतात.

**तडवीचे सण-उत्सव** : तडवी भिल्ल हे मूळ आदिवासी असल्याने आदिवासींप्रमाणे सण-उत्सव व आनंद साजरा करण्याच्या परंपरा या समाजात दिसून येतात. तथापि केवळ वनवासी न राहिल्याने व नंतर मुस्लिम संस्कृतीशी संबंध आल्याने हिंदू-मुस्लीम सण उत्सवांच्या परंपराही तडवी समाजात आहेत. हल्ली आदिवासी परंपरा लोप पावलेल्या दिसून येतात. हिंदूंची गुढीपाडवा, अक्षय तृतीया, पोळा, दसरा, दिवाळी या सणांच्या परंपरा तडवींनी जोपासल्या आहेत. याशिवाय इस्लामचा स्वीकार केल्यामुळे रमजान ईद, व बकरी ईद, मोहरम तसेच विविध पीरवल्याचे निघणारे संदल, भरणारे उरूस यात तडवी सहभागी होतात. तसेच रमजान महिन्यात रोजे ठेऊन उपवास देखील तडवी समाजातील लोक करतात.

**तडवी लोकनृत्य 'साजोनी'** : विविध आनंदाच्या प्रसंगी आनंदोत्सव साजरा करण्यासाठी म्हणून तडवी समाजात हे लोकनृत्य केले जाते. विशेषतः विवाहप्रसंगी युवती या आपल्या सखी बरोबर साजोनी लोक नृत्य करतात. त्याचप्रमाणे गावातून नवरदेवाची 'बिद्दी' फिरविण्यात येते, तेव्हा गोल रिंगण करून वाद्य वादकाच्या भोवती फेर धरून तालात व वाद्यांच्या ठेक्यावर युती 'साजोनी' लोकनृत्य करतात. तसेच वयोवृद्ध महिला देखील फेर धरून नाचतात. नागदिवाळीच्या वेळी, जत्रेत, तसेच भरघोस पीक आल्यावर किंवा अक्षयतृतीया सणाच्या वेळी युवक-युवती हे 'साजोनी' नृत्य करतात.

**तडवींची बोली** : तडवी बोली हा तसा स्वतंत्र संशोधनाचा अभ्यासाचा विषय आहे. तडवी हे मूळ भिल्ल आदिवासी असल्याने भिल्ली बोलीतील शब्द तडवी बोलीत अधिक प्रमाणात आहेत. उदाहरणार्थ- अबधाकी (आपोआप एकदम), डुल्ली (दुरडी किंवा पोळ्या भाकरींची टोपली), अढायकांड्या (आढाऊ, हमरीतुमरीवर येणारा), अछवानी (बाळंत काढा), आकाफोका (साधा सरळ), ईहीन (येईन), उखल्ला (उकिरडा), किर्रसान (कुणबी), तारील (तुझी), लवटी (बायको), डयडमरा (बुवा), लोक्या (नवरा), पेकना (देवी किंवा पीर अंगात येणे), बळ्ळी (डोंगर), कव्हराले हती (कण्हणे), केवटी (उडदाची डाळ), तिस्सुक (त्रिकोणी), चीन्गेल (सनकी किवा जिद्दी), दपाडेल (लपविलेले किंवा गुप्त), पस्सु (झोपाळू), पतोळ्या (पत्ते खेणारा जुगारी), (बुक्का-ठोसा), चावण्या झोडणे (कानात मारणे), चंधेय (घरामागची भिंत), डफळा डफळी (म्हातारा-म्हातारी) असे काही शब्द मूळ भिल्ली बोलीतील दिसून येतात.

मुस्लीम धर्म स्वीकारल्यामुळे व पीर फकिरांच्या सहवासात आल्यामुळे काही

प्रमाणात अरबी-फारसी शब्दही या बोलीत आढळून येतात परंतु त्यांचे प्रमाण कमी असून त्या शब्दांचे स्वरूपही अरबी-फारसी सारखे नसून दखनी, मुसलमानी बोलीसारखे आढळते. उदाहरणार्थ- अव्वल कुयाची (खानदानी), अतेल (अत्तर), अल्लानामी (देवाचा लाडका), अल्लाची गाय (गरीब स्वभावाची व्यक्ती), बेबख्खत (काळ वेळ न पाहता), करमबोहरा (करंटा), लौंडी (रखेल किंवा बटिक), सबन मिईकन (सर्व मिळून), हिझ्र हिझ्र पडना (हाल हाल होणे), हामीकारी - (जबाबदारी), झुट्या (खोटारडा), झगडकुदाई/या (भांडखोर कजाग महिला/पुरुष) या शब्दांचे स्वरूप पहिले तर अव्वल, अल्ला, अत्तर ऐवजी अतेल, बेवक्त ऐवजी बेबख्खत, करम बोहरा, लौंडी, सब मिलकर ऐवजी सबन मिईकन, हिझ्र-हिझ्र, झूट पासून झुट्या असे काही अरबी फारसीतील तद्भव व काही अरबी फारसीतील तत्सम शब्द म्हणता येतील.

तडवी ज्या प्रदेशात राहतात तो खान्देशचा भाग आहे. अहिराणी बोली ही या प्रदेशाची मुख्य बोली आहे. विशेषत: तडवींचे वास्तव्य असणारा चोपडा तालुका अहिराणी भाषिक असल्याने अहिराणीचाही प्रभाव तडवींच्या बोलीवर आढळून येतो. उदाहरणार्थ- अडीकन बसना (अडून बसणे) (अहिराणीत आडी बसना असा वाक्प्रचार आहे), उखल्ला (उकिरडा), उपाडी लिऊ (उपटून टाकू), एखला दुखला (एकटा दुकटा), अयीस (आळस) (अहिराणीत आयस), खोबडी फिरेल - तापट स्वभावाचा किंवा वेडा, चित लगाईकन (मनापासून), हेलाचा मस्तक (अडाणी किंवा जड डोक्याचा), बोकदरा (छिद्र पडलेले, फाटलेले किवा जमिनीतील बीळ), सेसारं बसेल (शिसारी आणणारे), अख्खा (सगळा) असे अनेक शब्द जे तडवी बोलीतही आहेत व अहिराणीतही आढळतात. तडवी बोलीतील वाक्प्रचारात क्रियापदाला 'कन' असा प्रत्यय लागतो तर अहिराणीत 'सन' असा प्रत्यय लागतो उदाहरणार्थ तडवी बोलीतील 'करीकन' ऐवजी 'करीसन' असा फरक होतो. तडवी बोलीतील काही शब्दांच्या उच्चारणांत अहिराणी बोलीतील लहेजा जाणवतो.

तडवींचे वास्तव्य असलेल्या यावल, रावेर, बुऱ्हाणपूर तालुक्यात लेवा समाज मोठ्या प्रमाणावर राहतो. शेती हा लेवा समाजाचा मुख्य व्यवसाय असल्याने व शेती आणि मजुरीसाठी लेवा समाजाच्यासंपर्कात आल्याने लेवांच्या बोलीचाही प्रभाव तडवी बोलीवर जाणवतो. उदाहरणार्थ- अऊत्या (औत काम करणारा शेतकरी), इतुइतु (थोडे थोडे), उपनती (टोपली), संटा (अविवाहित),खिसाना (खजील), खया (खळे), सादीभादी (भोळी भाबडी), भंडाई राहली (एखाद्या गोष्टीमुळे

दीर्घकाळ त्रास होणे, भंडावून सोडणे या अर्थाने), धीरेच्कन (हळूच), हिंडगायेलपणा (बीभत्स वर्तन, आगाऊपणा), असे अनेक शब्द हे लेवांच्या दैनदिन उच्चारातील आहेत. मात्र शब्दांमध्ये साम्य असले तरी तडवी बोलीचा लहेजा आणि लेवा बोलीचा उच्चारणातील लहेजा यात फरक आहे. त्यामुळे तडवी, लेवा व अहिराणी भाषिक स्वतंत्रपणे ओळखू येतात.

आधुनिक काळात शिक्षणाचे प्रमाण या समाजात वाढत असल्यामुळे प्रमाण मराठी शब्दही तडवी बोली बोलणाऱ्यांच्या तोंडून उच्चारले जातात. विशेषत: तरुण वयातील व कुमारवयीन शाळा, महाविद्यालयातील तडवी जमातीची मुले अहिराणी भाषिक पट्ट्यात अहिराणी मिश्रित प्रमाण मराठी बोलतात तर लेवा भाषिक पट्ट्यात लेवा बोली मिश्रित प्रमाण मराठी बोलतात. मात्र काही शब्द हे खास तडवी बोलीच्या व्यवच्छेदक स्वरूपावर प्रकाश टाकणारे आहेत. उदाहरणार्थ सर्वनामांना लागलेले विभक्ती प्रत्यय मालताल (मला), तुमताल (तुला), त्यानताल (त्याला), तिनताल (तिला) वगैरे. तसेच क्रियापादांना लागणारे कृदंत उदाहरणार्थ करीकन (करून), खाईकन (खाऊन), पिईकन (पिऊन), दिईकन (देऊन), ईहीन (येईन) वगैरे. यास्वरूपाचा भाषाशास्त्रीय, व्याकरणिक अभ्यास करून तडवी बोलीचे सखोल विश्लेषण मांडता येऊ शकते.

दैनंदिन वापराशिवाय काही गुप्त संकेत असणारी वाक्येही तडवी बोलतात. उदाहरणार्थ 'इकडं लारमांड गऊना ईहीन, तिकडं किर्रसान ईहीन' म्हणजे इकडून पोलीस येत आहेत तिकडून शेतकरी किंवा कुणबी लोक येतील. 'तिकडं आरोण्यात लंगडी हरण हं, चाल. शिकार आसन हुईन.' - एखाद्या माणसाचा कमजोरीचा फायदा उचलण्याची संधी असल्याचे या वाक्यातून सुचवायचे आहे. (शेतकऱ्याच्या शेतातील चोरी किंवा घरावर दरोडा टाकल्यावर पूर्वीच्या काळी अशा सांकेतिक भाषेत तडवी संवाद साधत असत.) या संदर्भात तडवींच्या गुप्त सांकेतिक बोलींचा समाज-सांस्कृतिक अभ्यास करता येऊ शकतो. मात्र मिश्रसंस्कृती जोपासणाऱ्या आदिवासी तडवींची बोली, त्यातील लहेजा, या बोलीची व्याकरणिक जडण-घडण, लोकसाहित्य या साऱ्याच बाबी अभ्यासाच्या दृष्टीने आव्हानात्मक स्वरूपाच्या आहेत. शिक्षणाच्या प्रमाणामुळे मूळ बोली बोलणाऱ्यांची संख्या कमी होत असल्याने या बोलीचे जतन-संवर्धन होणे, त्यातील लोकसाहित्याचे दस्तऐवजीकरण होणे अत्यावश्यक झाले आहे.

**संदर्भ सूची :**





अनुक्रमणिका

१. तडवी अजीज - 'सातपुड्यातील आदिवासी तडवी', हर्षवर्धन पब्लिकेशन्स बीड, प्र.आ. जून २०१६, पृ.क्र. ०७
२. https://vishwakosh.marathi.gov.in/21333/
३. तडवी अजीज – 'आदिवासी तडवी बोलीभाषेतील शब्द संग्रह कोश', पानफुल प्रकाशन, जळगाव, प्र. आ. २०११, पृ. क्र. ११.
४. केतकर श्री. व्यं. - 'महाराष्ट्र शब्दकोश', खंड चार, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई. पृ.क्र.१४५६.
५. जळगाव जिल्हा गॅझेटीयर, प्रमुख जाती-जमाती, पृ. क्र. २०५
६. तडवी अजीज - 'आदिवासी तडवी भिल्ल : समाज आणि संस्कृती', हर्षवर्धन पब्लिकेशन्स बीड, प्र. आ. डिसेंबर २०१६, पृ. क्र. ५८.
७. तत्रैव, पृ. क्र. ५३.

**रत्नागिरीचे काही खास शब्दप्रयोग**

प्रशांत शेलटकर, रत्नागिरी ह्यांच्या फेसबुक भिंतीवरून साभार

आज एका मित्राबरोबर फोनवर बोलताना सहज बोलून गेलो..' काय आडस' आहे रे! त्याने मला विचारलं.. काय म्हणालास.? मी म्हटलं..काही नाही..काही नाही. फोन झाला..आणि डोक्यात अशा खास रत्नागिरीच्या अफलातून शब्दांचा शब्दकोश उभा राहिला. आडस्' म्हणजे झकास, उत्तम. 'वड्स' म्हणजे एकदम मस्त. 'गडगा' म्हणजे कुंपणाची भिंत. एखाद्याला 'रेटवला' म्हणजे पराभूत केला. मिसळ 'रेटवली' म्हणजे यथेच्छ खाल्ली. पाऊस 'रेमटवून' पडला म्हणजे धो धो पडला. 'आयझो' म्हणजे 'ओ माय गॉड'. ट्रॅफिकमध्ये 'फुगलो' म्हणजे अडकलो. 'किचाट' म्हणजे गडबड गोंधळ गोंगाट. एखादा 'सरबरीत' असणे म्हणजे डोकं कमी असणे. एखादा 'सोरट' असतो म्हणजे डॅम्बीस असतो.

असं म्हणतात दर दहा मैलांवर भाषा बदलत असते. कोंकणातच चिपळूण, संगमेश्वर, रत्नागिरी, कुडाळ इथे भाषेचा बाज वेगळा असतो. मालवणी हा वेगळा प्रकार. एक प्रकारचा हेल कोंकणात भाषेला असतो. एखाद्याला काही सांगितलं आणि तो आश्चर्यचकित झाला की नुसतं 'हल्' असं डोळे मोठे करून बोलेल, किंवा प्रेमाने 'मेलास तू' असं म्हणेल. तूला ना चांगला चोप दिला पाहिजे असं नं म्हणता 'तुला फोकटवला पाहिजे' असं म्हणतात. ह्या व अशा अनंत शब्दप्रयोगांची नोंद कुठल्याही शब्दकोशांत नसते. भावना उत्कटपणे या हृदयातून त्या हृदयात पोहोचणं हे काम लेखी भाषेपेक्षा बोलीभाषा प्रभावीपणे करत असते आणि असे शब्द हे काम 'आडस्' करत असतात, नाही का?

## लेखक परिचय

**काकडे, श्रीकृष्ण, :** शंकरलाल खंडेलवाल महाविद्यालय, अकोला येथे मराठीचे प्राध्यापक

**चलभाष :** ९८५०२ ५००७९ **ईपत्ता :** kakadeshri@gmail.com

**काटीकर, आनन्द :** फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे मराठीचे प्राध्यापक, 'भाषा आणि जीवन'चे संपादक

**चलभाष :** ९४२१६ १०७०४ **ईपत्ता :** anand.katikar.marathi@gmail.com

**पानसे, श्रुती :** भाषा आणि मेंदूविज्ञान यांच्या अभ्यासक, **चलभाष :** ९८८१५ ०७०५५

**देशपांडे, देवीदास :** पुणे येथे मुक्त पत्रकार, भाषेच्या अभ्यासात विशेष रूची

**चलभाष :** ८७९६७ ५२१०७ **ईपत्ता :** devidas.desh@gmail.com

**तौर, पृथ्वीराज :** स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ येथे मराठीचे प्राध्यापक, बालसाहित्यकार, समीक्षक, **चलभाष :** ९५७९१ ३४४६६ **ईपत्ता :** anand.katikar.marathi@gmail.com

**भालेराव, इंद्रजित :** ज्ञानोपासक महाविद्यालय, परभणी येथे मराठीचे प्राध्यापक, सुप्रसिद्ध कवी, वक्ते

**चलभाष :** ८४३२२ २५५८५ **ईपत्ता :**

**पिलणकर, सायली सुरेश :** रत्नागिरी येथे बोली, समाज आणि संस्कृती यां विषयावर संशोधन सुरू,

**चलभाष :** ९५८८४ १२२८० **ईपत्ता : pilankarsayali@gmail.com**

**नगरकर, विजय :** भारत संचार निगम लिमिटेड येथून अधिकारी म्हणून सेवानिवृत्त,

**चलभाष :** ९४२२७ २६४०० **ईपत्ता :** vpnagarkar@gmail.com

**महाजन, अपर्णा :** इंग्रजी विषयाच्या निवृत्त प्राध्यापक,

**चलभाष :** ९८२२० ५९६७८ **ईपत्ता :** aparnavm@gmail.com

**पटवर्धन, निधी :** गोगटे-जोगळेकर महाविद्यालय, रत्नागिरी येथे मराठीच्या प्राध्यापक,

**चलभाष :** ७२६२८ ५६१८७ **ईपत्ता :** nidheepatwardhan@gmail.com

**किटकरू, सुनील :** नागपूर येथे मुक्त पत्रकार, ईशान्य भारताचे जाणकार आहेत. ९८९०४ ८९९७८

**चलभाष :** ९८९०४ ८९९७८ **ईपत्ता :** kitkaru7@gmail.com

**पाध्ये, विजय :** मराठी अभ्यास परिषदेचे उपाध्यक्ष, 'भाषा आणि जीवन'चे कार्यकारी संपादक

**चलभाष :** ९८२२० ३१९६३ **ईपत्ता :** v.wordsmith@gmail.com

**देवगोजी, विजयालक्ष्मी विजय,** लांजा. **चलभाष :** ८४४६३७५२५१

**लळीत, बाळकृष्ण रामचंद्र,** मराठी विभाग प्रमुख, चां.ता.बोरा महाविद्यालय, शिरूर जि. पुणे ४१२२१०.

**चलभाष :** 9665996260 **ईपत्ता :** brlalit@ gmail.com

**धनगर, धनराज तोताराम :** मराठीचे सहा. प्राध्यापक, महात्मा गांधी विद्यामंदिर संचलित कला आणि वाणिज्य महाविद्यालय, येवला, जि. नाशिक. ४२३४०१

**चलभाष :** ७७७५९ ८२५३४ **ईपत्ता :** dr.dhanrajdhangar@gmail.com





अनुक्रमणिका

**संदर्भ** - **(पृष्ठ ३० वरून)**


- रत्नागिरी जिल्हा : एक दृष्टीक्षेप, प्रकाशक – जिल्हा माहिती कार्यालय, रत्नागिरी, प्रकाशन वर्ष – २०१४-१५, पृष्ठ क्रमांक २
- भारतीय संस्कृतिकोश, खंड सहावा, संपादक – पं. महादेवशास्त्री जोशी, पुनर्मुद्रण वर्ष – मार्च २०१०, पृष्ठ क्रमांक ३४५ ते ३४७.


**साधनव्यक्ती** - सुमित मोरे – ८२७५४ २५०९१, साईराज मोरे – ८६५५५ ०१४२१

---

शिरगाव खाडीपट्ट्यात निरनिराळ्या ठिकाणी एकूण १५ 'वान' लावली जातात. शिरगाव खाडीपट्ट्यातील 'वान'त मिळणारे मासे पुढीलप्रमाणे : १) भाट (काळी) कुर्ली २) शेतूक ३) मेच ४) टोल ५) पिसवळ्या (पांढऱ्या) कुर्ली ६) बडवी ७) बोयर ८) काचूक ९) म्हाकुळ (हंगामी) १०) वाघळी ११) भरकल १२) शिरकोल १३) कालापे (शेवाळी मासा) १४) तांबोशी १५) पातोडी १६) शिंगटी

त्यातील काही 'वान' ही कांदळवन क्षेत्रात असल्याने ती नकाशावर दाखवणे शक्य नाहीत. मात्र किनारी क्षेत्रात लावली जाणारी काही प्रातिनिधिक 'वान' लाल अर्धवर्तुळात दाखविण्यात आली आहेत.

Imagery ©2020 CNES / Airbus, Maxar Technologies, Map data ©2020 200 m



मराठी अभ्यास परिषद



बुकपोस्ट- बुकपॅकेट-त्रैमासिक
BOOK PACKET
Containing Periodical
UGC Care Listed Journal
RNI No. 40048/83 I ISSN 2231-4059
Marathi Abhyas Parishad Patrika.

मूल्य ₹४०/-
मराठी अभ्यास परिषद पत्रिका
वर्ष ३८,अंक २-३,
उन्हाळा-पावसाळा २०२०
एप्रिल-जुलै २०२०

**प्रेषक : मराठी अभ्यास परिषद**
**व्दारा - आनन्द काटीकर, बंगला क्र. 7, फर्ग्युसन महाविद्यालय आवार,**
**गोपाळकृष्ण गोखले मार्ग, डेक्कन जिमखाना, पुणे - 411004**
**चलभाष : 94216 10704** | marathi.abhyas.parishad@gmail.com



